# सुवास आणि रस

[ कवितासंग्रह ]

भवानीशंकर श्रीधर पंडित

मूल्य रुपये २-८-०

व्हीनस बुक स्टॉल : पुणे २



माझ्यावर अपत्यनिर्विशेष प्रेम करणारे

माझे पितृव्य

**कै. केशव नरसिंह खांडेकर**

यांच्या पुण्यस्मृतीस



# सुरुवातीस

माझ्या स्फुट कवितांचा हा तिसरा संग्रह दुसऱ्या संग्रहानंतर तीन वर्षांनी प्रकाशित होत आहे. माझ्या कवितांचा दुसरा संग्रह पहिल्या संग्रहानंतर सतरा वर्षांनीं प्रसिद्ध झाला होता. त्या मानानें हा संग्रह पुष्कळच लवकर बाहेर पडत आहे. दुसऱ्या संग्रहांत १९४३ पर्यंतच्या निवडक कवितांचा अंतर्भाव केला होता. या संग्रहांत त्यानंतरच्या दशकांत लिहिलेल्या निवडक कवितांचा समावेश केला आहे. ह्यांतील बहुतेक कविता त्यांच्या लेखन-कालीं निरनिराळ्या प्रचलित व अस्तंगत नियतकालिकांतून आल्या आहेत. त्यांचा हा संकलित संग्रह पहिल्या दोन संग्रहांप्रमाणेच महाराष्ट्रांतील रसिक वाचकांना प्रिय होईल असा भरंवसा आहे.

या संग्रहांतील आदिम व अंतिम कविता सोडल्यास बाकीच्या साऱ्या कविता कालानुक्रमाने दिल्या आहेत. मात्र क्रमांक ६९,७० व ७१ या कविता जुन्या आहेत. ६९ क्रमांकाची कविता नागपूरहून निघणाऱ्या संकेत या साप्ताहिकाच्या २२-१०-३८ च्या दिवाळी अंकांत आली होती. स्वातंत्र्यपूर्वकालांत तिचें संकलन सुकर नव्हतें, म्हणून ती आतां संकलित करीत आहें. ७० व ७१ क्रमांकांच्या कविता मोहम्मद इक्बाल यांच्या अनुक्रमें ‘ दुनियाकि महफिलों से उकता गया हुँ यारब ’ आणि ‘ आता है याद मुझको गुजरा हुआ जमाना’ या उर्दू कवितांचीं मराठी रूपांतरें आहेत. तीं १९३८ सालीं विहंगमाच्या अनुक्रमें ऑगस्ट व सप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्धि पावलीं होतीं. अलिकडे कै. साने गुरुजींच्या आंतरभारतीच्या कल्पनेस चालना मिळत आहे. त्यांच्या साधना या पत्रांत अशीं रूपांतरें येत असतात. तेव्हां त्या तऱ्हेचा एक पूर्वीचा प्रयत्न म्हणून हीं दोन्ही रूपान्तरें या संग्रहांत मुद्दाम घातलीं आहेत.

कवित्वाचें बीजारोपण झालें कीं आधी आधी कोंवळ्या अंकुरांकडे आणि हिरव्या हिरव्या गार पानांकडेच लक्ष विशेष वेधतें. परंतु हीं पानें चोळा-मोळा होतात आणि शेवटीं त्यांचा पाचोळा होतो. पुढे पुढे फुलांना बहर येतो. त्यांतील सुवास दरवळला म्हणजे चित्तवृत्ति प्रफुल्लित होतात परंतु या सुवासाचें अस्तित्व क्षणिक असतें. भावना ही सुवासासारखीच आहे. सरतेशेवटीं या फुलांतूनच फळांचा संभव होतो. फळांचा रस हा जेवढा आनंददायक तेवढाच पोषकहि असतो. विचार हे रसाप्रमाणें आहेत. या संग्रहांतील कांहीं कविता भावनांवर तर कांहीं विचारांवर अधिष्ठित आहेत. हें लक्षांत घेऊनच या संग्रहास ' सुवास आणि रस ' हें नांव दिलें आहे.

माझा हा संग्रह आत्मीयतेने व मोठ्या तत्परतेने प्रसिद्ध केला याबद्दल व्हीनस बुक स्टॉलच्या संचालकांचा मी अत्यंत आभारी आहें.

स्टेशनरस्ता-खापर्डेबगीचा<br>अमरावती<br>२९-९-१९५३

**भ. श्री. पंडित**



# अनुक्रमणिका


| क्रमांक | कविता | पृष्ठांक |
|---|---|---|
| १ | रसिकास | १ |
| २ | विमानास | ३ |
| ३ | विमान | ५ |
| ४ | वादळ | ७ |
| ५ | कागदी पतंगास | ८ |
| ६ | कुठुन विश्वशांति ? | १० |
| ७ | शत शरद् | १२ |
| ८ | नवें-जुनें | १३ |
| ९ | स्त्री | १५ |
| १० | श्रीधरसदन; नागपूर | १७ |
| ११ | स्फूर्तीस | १८ |
| १२ | शाप | २० |
| १३ | चुटपुट | २२ |
| १४ | हे अजस्र यंत्रा ! | २३ |
| १५ | अ–स्वीकार | २५ |
| १६ | विश्वच अवघें हें माझें घर | २६ |
| १७ | युगान्त | २८ |
| १८ | साफल्य | ३० |
| १९ | दुर्भिक्ष | ३२ |
| २० | श्रमजीवी चाकांनो ! | ३४ |
| २१ | प्रणयोन्माद | ३६ |
| २२ | श्यामकिशोर | ३७ |
| २३ | आईचें लाडकें | ३९ |
| २४ | स्मृतिशल्य | ४० |
| २५ | जीवनकलह | ४१ |
| २६ | इंद्रप्रस्थाकडे | ४२ |
| २७ | सुप्त ज्वालामुखे ! | ४३ |
| २८ | छाया | ४५ |
| २९ | अर्वाचीन अर्जुन | ४६ |
| ३० | राष्ट्रध्वजास | ४८ |
| ३१ | मयासुरास | ५० |
| ३२ | भाऊबंदकी | ५१ |
| ३३ | श्रमजीवि मधमाशांचा गुंजारव | ५२ |
| ३४ | कौतुक | ५४ |
| ३५ | वामनास आवाहन | ५५ |
| ३६ | श्रमसौंदर्य | ५६ |
| ३७ | भाऊ-भाऊ | ५७ |
| ३८ | देवदानवांतला दुवा | ५९ |
| ३९ | दोन वृत्ति | ६३ |
| ४० | फळ आणि पाखरूं | ६४ |
| ४१ | तुझे डोळे | ६५ |
| ४२ | डिवचलेला वाघ | ६६ |
| ४३ | भाग्यपरीक्षा | ६७ |

| क्रमांक | कविता | पृष्ठांक |
|---|---|---|
| ४४ | अमर महात्मा | ७० |
| ४५ | तूं हास | ७१ |
| ४६ | दूरस्थ अपत्यांना | ७३ |
| ४७ | स्वतंत्र भारत | ७४ |
| ४८ | ताजमहाल | ७५ |
| ४९ | उमरखय्यामास | ७६ |
| ५० | २६-१-५० | ७८ |
| ५१ | ध्वजवंदन | ७९ |
| ५२ | मला माझ्या काव्यांत पहा | ८० |
| ५३ | दोन कणसें | ८१ |
| ५४ | उध्वस्त संसार | ८३ |
| ५५ | खालचा थर | ८४ |
| ५६ | कला आणि जीवन | ८७ |
| ५७ | वर्णविद्वेष | ८९ |
| ५८ | प्रीति आणि प्रौढी | ९० |
| ५९ | विशालजीवन | ९३ |
| ६० | जगाचा नकाशा | ९४ |
| ६१ | दान | ९६ |
| ६२ | सहचरीस | ९७ |
| ६३ | माकुलें | ९८ |
| ६४ | सीमोल्लंघन कोठलें ? | १०० |
| ६५ | श्रीलक्ष्मीस | १०१ |
| ६६ | ध्येयधारणा | १०२ |
| ६७ | तें माझें घर ! | १०४ |
| ६८ | शोध | १०८ |
| ६९ | शाबास आहे तुझी ! | ११० |
| ७० | मनींची आशा | १११ |
| ७१ | पिंजऱ्यांतील बुलबुलाची फिर्याद | ११४ |
| ७२ | रसिकास— | ११६ |

# १. रसिकास

[ जलधरमालेप्रमाणे ]

मळा न केवळ रसिका ! हा माझाच
घाम गाळला मीं येथें हें साच !

दयाघनाचा नसता जर पाऊस
चढता तर का उंच एवढा ऊस ?

केली जागुन मीं याची निगराणी,
यास पाजिलें मीं पाटाचें पाणी,

झाला याचा मूलांतुन उत्कर्ष !
मातीमधला शिवुं बघतो आकाश !

वई रसज्ञा ! चोरांचिलटांसाठीं
तुला न येथें यायाची अडकाठी !

उभा तुझा मी करावया सत्कार
पहा, मळा हा; पहा, ऊस भरदार !

रसें रसरसे हा पेरापेरांत
आहे आतां अगदीं ऐन भरांत !

चरकावांचुन याची पारख हो न
ती रसवेत्त्या ! करील तुजविण कोण ?

तोड, फोड या काढ पिळून खुशाल,
चाख, चोख, रस पी मन जों मानेल,

फेक चिपाडें, चोई, चोथा दूर
रसज्ञ तूं घे रसास्वाद भरपूर !

अमरावती
११-३-५२

वई-कुंपण.



## २. विमानास

[ उघडिं नयन रम्य उषा ]

रे विमान ! संचरसी स्वैर अंतराळीं
उंच तूं परंतु तुझी दृष्टि मात्र खालीं !

विगत अमित शतकांचें
मनुजस्वप्न तूं साचें !
फुटती तुज पंख आज–युद्धमानकालीं !

वाहन तूं वेगवान
सागर–घागरसमान !
वामन तूजलागिं व्योम ! वीत भू विशाली !

साहसप्रिय तूं निर्भय
भूस तुझें भारी भय
करिसी तूं भग्नहृदय तिजसि अग्निगोळीं

मानवता हो उन्नत
अथवा ती हो अवनत ?
वायुविजय हा अथवा ही तिचीच होळी ?

मानव जों दानव तों
घात तुला शिकविल तो
चालक तो, मालक तो, तोच तुझा वाली !

विश्वबंधुता कुठली ?
शांतिदूतता कुठली ?
विसर; जों न मानवता देवता जहाली !

येइ न तो शुभ मुहूर्त
तों राही तूं अमूर्त !
आधीं दे मानवास चालुं नीट चालीं !

नागपूर
१५-११-४४



## ३. विमान !

[ अग्निरथा धाव धाव ]

उंच उंच रे विमान—
संचर गरुडासमान !

उचल तुझें अचल अंग—
धरणीचा सोड संग;
अवकाशीं चढ अभंग,
ऊर्ध्व दिशीं कर प्रयाण !

आवेगीं पंख झडप,
भूभागीं वायु दडप,
लाव जोर, दाव तडफ,
गांठ निळें आसमान !

उन्नत गिरि–होती नत !
रुंद सरे–आकुंचित !
क्षेत्रें–अति अति सीमित !
मनुज-बाहुलीं लहान !

हें सारें दृश्य पुढे
ज्यावेळीं दृष्टि पडे
वाटे संवृत उघडें
मानचित्र सप्रमाण !

घाल अखिल विश्वावर
प्रीतीची तव पाखर !
सोडुन अन्यत्र प्रखर—
घेउं नको व्यर्थ प्राण !

उच्च तुझें गमन जसें
उच्च असो ध्येय तसें
‘ मानवता एक असे ’
घुमव मंत्र हा महान !

नागपूर-अजनी
२३-४-४५

आसमान–आकाश; मानचित्र–नकाशा; संवृत–झांकलेलें



## ४. वादळ

[ प्रणयप्रभा ]

आभाळ चहूंकडुनी भरलें
भरले डबडबुन तुझे डोळे !

भोंवताल हें धुंदुक मुंदुक
तुझ्या मनीं गतगोष्टी अंधुक
त्यांत कसलिशी आणिक रुखरुख
मुख मूक परी मुद्रा बोले !

दूर कुठेतरि सर ओसरली
झालिं सुगंधित शेतें ओलीं
तुझी मागली स्मृती जागली
उलगडलें सहज तिचें जाळें !

आलें-गेलें क्षणांत शिरवें
गेलीं गळुनी तुझीं आंसवें
वादळवारें थांबलें जवें
निवळलें तुझें मन खळबळलें !

नागपूर
१७-४-४५



## ५. कागदी पतंगास

[ करूं नको फुंफाट ]

पतंगा ! किती असा उडशील ?

देत गिरिकिला गिरके गरगर
ओढित वरला दोरा सरसर
वातावरणीं वरवर वरवर
किती असा चढशील ?

अनुकूल तुला वारा वरतीं
स्पर्धेला नच कोणी भंवतीं
म्हणुनी ऐटिंत काढुन छाती
त्यार्शिच का लढशील ?

जणूं गांठला स्वर्ग सुताने
झालें आतां गगन ठेंगणें
किती असा तूं या अभिमानें —
नाचत फडफडशील ?

पहा, अचानक झंझावातें
तुटेल कंदी, सुटेल कमटें,
उलटे सुलटे खाशिल पलटे
उगाच धडपडशील ?

दो कमच्यांचा ढिला सांपळा !
देह कागदी-चोळामोळा !
तुरा त्रिकोणी-झडेल सगळा !
नसे तुझें धड शील !

सूत्रधार तव निराश चित्तीं
बसेल चोळित हात खालतीं
दृष्टीदेखत त्याच्या अंतीं
धुळींत तूं पडशील !

नागपूर
२८-४-४५



## ६. कुठुन विश्वशांती ?

[ बांधावर झुडुप एक ]

वर्चस्वास्तव जगतीं
जे पिसाट धडपडती
  जों वरती
  बडबडती
ते स्वकीय गीती
कुठुन विश्वशांती ?

आंतरराष्ट्रीय कलह
मानूं समरांगणार्ह
  करूं त्यांत
  घातपात
नाशुं तरुणजाती !

( त्यांचें गाणें )

‘सत्तेची चिर आशा,
मत्तेची अभिलाषा
  जिंकुं भुजें
  साम्राज्यें
हीच राजनीती !

दुबळ्यांच्या नाचुं शिरीं,
वर्णभेद घालुं भरीं
  सममतीस,
  संस्कृतीस
देउं मूठमाती !

संहारक शस्त्रास्त्रें,
विध्वंसक विषयंत्रें
  घेउं बळें
  जग सगळें
हीच न्यायशक्ती !

टाकुनिया मानवता,
अंगिकारुं दानवता
  पशु सारे
  फार बरे
पटवुं ही प्रतीती !’

कुठुन विश्वशांती ?

कुठुन विश्वशांती ?

कुठुन विश्वशांती ?

नागपूर

३०-४-४८



## ७. शतशरद्

[ कल्याण ]

शरद शंभर जगूं !

भाउ भाऊ असूं
एक असती असूं
एकमेकांस करुं साह्य विपदीं; तगूं.

एक मेळीं बसूं,
एक वेळीं हसूं
ठेवुं नच विषमता—हा गुरू, तो लघू.

वादळें गर्जुं द्या,
वज्र वा वर्जुं द्या
करुं परस्पर परित्राण, नच डगमगूं.

लंघुं ज्ञानोदधी
होउं तेजोनिधी,
अग्निदेवापरी अध्वरीं धगधगूं.

घालुं या कर करीं,
ऊर लावूं उरीं
आणि डोळेभरी शरद शंभर बघूं.

इंदूर
१४-५-४५.

वर्जुं द्या—सुटूं द्या, पडूं द्या. अध्वर—यज्ञ.



## ८. नवें-जुनें

[ मालकंस ]

परंपरागत तेंच जुनें जग
त्याच जगांतुन निघे नवें युग.

काल बरसलें पाउसपाणी
आज उडालें वाफ होउनी
तरंगतांना दिसतिल गगनीं-
उद्यां तयाचे गडद निळे ढग.

पेरायाला जुने पुराणे
जपुनि ठेविले होते दाणे
आतां त्यांतुन नवीन धान्यें-
उगवतील भरघोंस लगोलग.

आजे गेले, पणजे गेले,
आज वडिल ते जातिल कालें
नातू, पणतू येतील मुलें
जुनी जाय तर नवी पिढी मग.

रूढ जाहली रूढी मागें
तीच नको हो आगे आगे
सुधारणा जी करणें लागे-
तीच पुढें हो रूढी दुर्भग.

नवें-जुनें हा वाद वाउगा
नवें जुन्याची घेई जागा
उभयीं आहे अखंड धागा
जुनें-नवें हा क्रम चिर अविलग.

इंदूर
२१-५-४५.



## १. स्त्री

[ भैरवी ]

क्षणमात्रच केवळ तूं रमणी
पण युगायुगांची तूं जननी !

सुंदर, मधु, मृदु जें जें जगतीं
तें तें अवघें योजुन हातीं
घडवी धाता त्वदीय मूर्ती
उत्कृष्ट कलाकृति तूं म्हणुनी.

मूळ महामाया तूं मुख्या
आदिपुरुष नारायणभार्या
उभयीं सृजिलें तुम्हीं जगा या
तो कारण केवळ ! तूं करणी !

आधीं जननी, मग तूं भगिनी,
नंतर गृहिणी, पुढें नंदिनी
चतुर्विध अशीं रूपें धरुनी
तूं पुरुषालागीं करिसि ऋणी.

असो सुता अथवा सुत दोन्हीं
तुझ्याच उदरीं येती जननी !
श्रेष्ठ खरोखर तूं जनकाहुनि
तुज ओळखती, नच त्यास कुणी.

असंभाव्य जनसंभव तुजविण,
अशक्य तुजविण कुटुंबजीवन,
तुजविण कोठुन समाजधारण ?
जग बुडेल तुजवाचुन शून्यीं !

इंदूर
१-६-४५.



## १०. श्रीधरसदन; नागपूर

[ गजल ]

निवांत शांत किती आपुलें निकेत सखे !
श्रमूं-रमूं मिळुनी तूं नि मी तयांत सुखें.

पिसाट दाटिहुनी दूर दूर एकिकडे
कुटुंबजीवन हें फार फार फार निकें.

पडेल ऊन कधीं, साउली पडेल कधीं,
क्षणार्ध आणि कधीं त्यामधीं पडेल धुकें.

लिहीन मी कविता तूं म्हणून दाखव त्या
विरंगुळा दुसरा याहुनी असूं न शके.

वसूं खरें विजनीं मात्र येऊं-जाउं जनीं
समाजशील असूं, जोडुं स्नेहशील सखे.

करूं मुदें जुळुनी पर्वणी तदागमनीं
समग्र सारुं निशा काव्यशास्त्रकर्मणुकें,

नकोत ख्यालिखुशी, हावहौशि अन् चुरशी
विभो ! मिळोत सदा शांति, तुष्टि; दे इतुकें.

इंदूर
३-६-४५.



## ११. स्फूर्तीस

[ परज ]

थांब–थांब–थांब क्षणिक !

तुजसि विरल वायु म्हणूं ?
काय तरल गंध गणूं ?
चपल तूं प्रकाश जणूं !
कीं यांहुन–भिन्न, अधिक ?

क्षणिं मनांत, क्षणिं जनांत,
क्षणिं तिसऱ्या तूं वनांत,
वास तुझा त्रिभुवनांत,
भास–वस्तुवस्तुगणिक !

चित्रूं तुज ?—तर न रंग !
गाऊं ?—स्वर होत भंग !
रचुं कवनीं ?—शब्दसंघ—
जाय विरुन !—मी अगतिक !

तूं—प्रसन्न चिरयौवन !
मृतजीवन-संजीवन !
तुजमध्यें अक्षयपण !
तूं निर्गुण, निष्कलंक !

दर्शन तव ओझरतें
व्हावें तें मज पुरतें
म्हणुन तरी ये ! परते !
राहूं मी काय विमुख ?

नागपूर
१९-१०-४५.

## १२. शाप

[ सार्धपाण्डव गझल ]

निष्ठुरांनो ! काय हें !
फेंकुनी अण्वस्त्र केंठें जाय बन्धू हाय हे !

जाहले पंगू कुणी,
मूक कोणी, अन्ध कोणी, व्यंग कर्णी कीं कुणी.

पौरुषालागीं मुके,
जन्मदाता; जन्मदात्री गर्भपातानें सुके.

अर्भकांना पारखीं
मायबापें जाहलीं; झालीं तयांना तीं मुकीं.

नष्ट झालीं मन्दिरें,
शिल्प मातीला मिळालें; भग्न झालीं आगरें.

दिव्य शक्ती लाभली
योजिली ती ध्यावयाला शक्तिहीनांचे बळी !

पूर रक्ताचे किती !
आणि अस्थींचे गिरी हे—त्यांस आहे का मिती ?

राक्षसांनो ! काय हें !
हें कशासाठीं ? कशाला पाप केलें हाय हें ?

पाहिजे मत्ता तरी
ती सुखें घ्या ! पाहिजे सत्ता तरी ती घ्या करीं !

यादवीनें या अशा
ओढवोनी कां बळें घेतां स्वतःची दुर्दशा ?

प्राण घेणारे नवे
शोध लावा नी तसे नाचा जसे तुम्हां हवें !

हें धरा ध्यानीं परी
श्वास मेल्या चामड्याचा भस्म लोहाचें करी !

नागपूर
४-११-४५

मेल्या चामड्याचा श्वास—लोहाराच्या अगोठीच्या धमनीचा वारा.



## १३. चुटपुट

[ मल्हार ]

क्षितिजावर श्रावणढग तिरती
वरवर गगनीं भरभर चढती !

झांकळुनी ये क्षणिं चहुंकडुनी
श्यामल धूमिल अवघी अवनी,
कोटरकुक्षीं
लपती पक्षी,
सरिवर सरि सरसर ओसरती.

सतत झड झडे, लव नच उघडे
मेघ गडगडे, वीज कडकडे
पंकीं दर्दुर
करिती टुरटुर,
रात्रीचे कीटक किरकिरती.

रान डुले ना, पान हले ना
वाटेवरुनी नजर चळे ना
मृदुल करतलीं
पातळ हनु-वळि
हृदयांत सारखी चुटपुट ती !

नागपूर
८-११-४५



## १४. हे अजस्र यंत्रा !

[ बांधावर झुडुप एक ]

हे अजस्र यंत्रा !

मानव तव निर्माता
तोच दास तव आता
राबविशी
तूं त्याशीं
तास पूर्ण सत्रा.

एक हवें तैलपान
नलगे मग तुजसि आन
कणखर तूं
तुज परंतु
हृदय न दितिपुत्रा.

सात तास विश्रांतिस
भत्त्याचें परि आमिष,
तो स्वतंत्र
होइ यंत्र
मानी तव तंत्रा.

पोलादी तव पायीं
पार ठार व्यवसायी !
रे निर्दय !
तूं तदीय
ओढिलेंस अंत्रा.

दानव तूं मूर्तिमंत
तुजलागीं कर अनंत
त्यांपुढतीं
हाय ! किती—
दोघांची मात्रा ?

प्रतिकुबेर पुंजीपति
तुजलागीं दिनरातीं
नाचविती
निज हातीं
ठेवुनिया सूत्रा.

| | |
|---|---|
| तुजमध्यें बळ प्रचंड | श्रमजीवी करी काम |
| सामर्थ्यें तूं उदंड | निढळींचा ढाळि घाम |
| अंग–गुणें | त्याचे पण |
| कोटिगुणें | हालही न |
| कृति तुझी विचित्रा. | खाई कुणि कुत्रा ! |

नागपूर
१०-११-४५.

अंत्र–आंतडें.



## १५. अ-स्वीकार

[ प्रणयप्रभा ]

लाडकें जिवाचें फूल तुझें
हळुहळू पहा ! हें कोमेजे !

आसू यावर किती शिंपिले,
लागो ना धग म्हणुनी जपलें,
तळामुळाशीं खात ओपिलें,
टवटवे न हें मरगळलें जें !

हासे ना हें सूर्यप्रकाशीं,
डोले ना हें मारुतपाशीं,
बोले ना हें विहंगमाशीं,
सुरकुते न राही हें ताजें !

पाहुनि याला केविलवाणें
वाटे मजला उदासवाणें
फूल आपुलें हें परते ने
मज नको न होई जें माझें !

नागपूर
११-११-४५



## १६. विश्वच अवघें हें माझें घर

[ सवालाप्रमाणे ]

‘ विश्वच अवघें हें माझें घर ’—
हीच भावना दृढ झाल्यावर
हा काळेला,
तो गोरेला
कुठून हा विद्वेष ?

घरास असती अनेक खोल्या
प्रत्येकाला वेगवेगळ्या
तसेच दिसती
अफाट जगतीं
आपआपुले देश.

भाऊभाऊ आपण सगळे
मानवता–मातेचीं बाळें
स्वतंत्र आहों,
समान आहों
भिन्न भिन्न जरि वेष.

करूं न लव मर्यादातिक्रम,
बनूं प्रेममय, ठेवूं संयम,
तर मग कोठुन
कटकट, भांडण ?
कुठून छळबळ क्लेश ?

नागपूर
३-१-४६

छळबळ–कपट व जबरदस्ती



## १७. युगान्त

[ स्वच्छंद छंद ]

पिवळ्या पाना ! पड, पड, पड.

पिकल्यावरतीं
सुकल्यावरतीं
कशास जगण्याची धडपड ?
पिवळ्या पाना ! पड, पड, पड.

कशास फडफड ?
कशास तडफड ?
कशास वाऱ्यावर बडबड ?
पिवळ्या पाना ! पड, पड, पड.

रंग फिकटला,
झरा आटला,
शिरा अखडल्या, कांहिं न घड.
पिवळ्या पाना ! पड, पड, पड

पहिली वहिली
बहार गेली,
अखेरली आतां पडझड
पिवळ्या पाना ! पड, पड, पड.

खालीं नवथर
फुटले अंकुर
होतिल आतां ते वरचढ !
पिवळ्या पाना ! पड, पड, पड.

कां भेदरसी ?
कां हादरसी ?
चल, ये ! भूच्या कुशींत दड.
पिवळ्या पाना ! पड, दड, पड !

नागपूर
१९-१-४६



## १८. साफल्य

[ पादाकुलक ]

या शेल्याहुन त्या शेल्यावर
ज्वारीनें लवथवलें वावर
उभे ताठ रांगेने धांडे
कणस कणस—मोत्यांचें पेंडें !

एक एक राखाया मोतीं
परजुन पातीं धांडे सजती
कृषिराज्ञीचे भालाइत हे
खडें सैन्य हें त्यांचें आहे !

शिरतील कुणी चोरपाउलीं
याव्या त्यांच्या नीट चाहुली
कान म्हणुन टंवकारुनी असे—
घेती कणसें हीं कानोसे.

आला वादळवारा भीषण
उफाळली धांड्यांची फलटण
भयें उडाली त्यांची गाळण
केलें त्यानें शीघ्र पलायन;

परंतु जेव्हां निळ्या ढगावर
फडकावित विद्युत्ध्वज सुंदर
आला प्रेमळ पाउसराणा
लवले धांडे, नमल्या माना.

" देतों मी हें तुम्हांस जीवन
याचें कारण तुमचें जीवन
सेवेमाजीं, त्यागामाजीं
सुफलित व्हावें इच्छा माझी."

ऐकतांच ही त्याची इच्छा
सळसळली तीं, " अच्छा-अच्छा."
इच्छा ती मानून तदाज्ञा
केली त्यांनीं भीष्मप्रतिज्ञा

कीट, विहग, पशु, मानवकोटी
प्राण समर्पूं त्यांच्यासाठीं.
कीट लागले देह पोखरूं,
विहग लागले चढाई करूं,

मारुन गेले पशू मुसंडया,
छाटुन गेले मानव मुंडया.
केले प्राण्यांस्तव प्राणार्पण
कृतार्थ झालें त्यांचें जीवन !

नागपूर
२-३-४६



# १९. दुर्भिक्ष

[ सारंगवृत्त ]

ये ही क्षुधा राक्षसी खूप खादाड
सर्वत्र घाली गिधाडापरी धाड !
जी जी दिसे वस्तु ती ती गिळी पार
आधीं अधाशी, उपाशी पुन्हां फार.

पिंजारल्या दाट झिंज्या लटा राठ,
कांटा नसे कंबरेचा उभा ताठ,
बाहेर आले निघोनी पुरे दांत,
रोडावले पाय, रोडावले हात.

डोळे उदासीन गेले किती खोल,
वाळून कोळून खालावले गाल,
मारी मिठी—थेट ध्यायास ये भेट
हें पाहुनी पाठ पोटास दे नेट.

अंगावरी लक्तरें लोंबती लांब,
टांचांतुनी रक्त सांडे—म्हणे, ‘थांब !’
धावे तरी धूम कंकाल बेताल
नाचे, करी एक आकाश-पाताळ.

येई उफाळून सारा असंतोष
'अन्नान्न-अन्नान्न-अन्नान्न- ' आक्रोश!
समृद्ध संपन्न चित्तीं भयग्रस्त,
सत्तेस चिंता-' न होवो कुठें अस्त '!

नागपूर
५-६-४६

कंकाल—अस्थिपंजर



## २०. श्रमजीवी चाकांनो !

[ पादाकुलक ]

श्रमजीवी चाकांनो ! थांबा !
थांबा थोडें, थांबा थोडें,
अडेल तुमच्यावाचुन अगदीं
यंत्राचें या अवजड गाडें.

तुम्हांस ठेवुन तिष्ठत कष्टत
आपण होई मात्र अधिष्ठित
उलथुन पाडा यास पालथें
उगवा याचा सूड यथास्थित

अवाढव्य हें परंतु दुबळें,
धनवंताच्या हातिं बाहुलें
कळ दाबुन तो यास नाचवी
करा खिळे पण तुम्ही खिळखिळे.

घशास लागे अखेर घरघर
तोंवर फिरतां कशास गरगर ?
तेल न, वस्त्र न, विराम न क्षण
कां ही करतां किरकिर कुरकुर ?

कशास विटतां ? कशास किटतां ?
कशास ओठांतच पुटपुटतां ?
पिळवटुनी आंतून आंतडीं
ताडताडकन कशास तुटतां ?

असहकार, प्रतिकार करा अन्
जुल्म-जबरी-जोरा चुकवा
आहे दुनिया गरिबांचीही
धडा धनाढ्यांना हा शिकवा

नागपूर
५-८-४६



## २१. प्रणयोन्माद

[ प्रणयप्रभा ]

उन्माद अदम्य तुझा प्रणया !
उच्छृंखल तो करितो हृदया.

फुटे पिकाला कंठ त्यामुळें,
मोराला नव पिसारा मिळे,
खद्योताचा प्रकाश उजळे,
अंब्यावर मोहर ये उदया.

आंत आंत तारुण्य जों स्फुरे
वरवर तों लावण्य तरारे
अशा प्रकारें तुझ्याच द्वारें—
हो जीवसृष्टिचा विकास या.

ललितकलांचा तुझ्यांत उद्गम,
रासविलासांसह रससंगम,
सुंदर सुखकर स्वप्नसमागम,
हृदयंगम तें तें सर्व सख्या !

नागपूर
७-८-४६



## २२. श्यामकिशोर

[ तोटक ]

मुकुटांत मनोहर मोरपिसें,
कमरेवर सोनसळा विलसे,
वनमाल उरीं,
मुरली अधरीं,
नवनीरजश्यामलता शरिरीं.
कुरणावर धेनुंत संचरतो
नटनागर तो ! नटनागर तो !

दिसतांच कुणी गवळीण पथीं
करि तो शिरिंची चरवी उलथी
चटकावि दहीं,
मटकावि महीं,
मधु गोरस पोट भरून पिई.
पळ तो न तिथें मग तो पळतो
नटचंचल तो ! नटचंचल तो !

उठती घन चोहिकडून नभीं
तरि तो तिरतो यमुनेंत, न भी,
क्षणिं घेइ उडी,
क्षणिं देइ बुडी,
क्षण घाबरवी निज खेळगडी.

कुणि कांहिं म्हणा--परि नायकतो
नटनायक तो ! नटनायक तो !

दिन मावळतांच गृहीं परते
नगरांत उभे जन उत्सुक ते
धरितात करीं,
चुरितात उरीं
मुख चुंबत चुंबत प्रेमभरीं
भुलवी अवघे जणुं चेटुकिं तो
नटनाटकि तो ! नटनाटकि तो !

नागपूर
२५-९-४६



## २३. आईचें लाडकें

[ सहा अक्षरी छंद. प्रति दुसऱ्यावर टाळी ]

मऊ मऊ लाल
मखमाली गाल,
हनुवटी सान
तींत खळी छान,

दूध घोंट घोंट
पिती कौळे ओठ
इवलाले त्यांत
दुधाचेच दांत,

जावळाचे केस
कुरळे विशेष,
काळे काळेश्यार
डोळे पाणीदार

आईचें तें बाळ
तूं का लडिवाळ ?

नागपूर
५-१०-४६



## २४. स्मृतिशल्य

[ दुर्गा ]

गेला तो ऋतु ! गेला तो ऋतु !
उगीच भ्रमरा ! कां भ्रमसी तूं ?

नसानसांतुन रस रसरसला,
अंगांगांतुन मद मुसमुसला
नववेलीला
बहार आला
तुझा न पुरला आंतर हेतू !

सरली आतां सकल माधुरी,
नुरली मृदुता विकल शरीरीं
जळला गळला
फुलोर सगळा
सुटले तुटले तंतू तंतू !

जाडें भरडें काष्ठ कोरडें
भुतासारखें उभें तुजपुढें
कांटे करडे
तेच तेवढे—
उरले मागें हाय ! परंतू.

नागपूर
२०-११-४६

## २५. जीवनकलह

[ जाति-सरसी-अंतरा फटक्याचा ]

अवतें भंवतें होते कांटे प्रफुल्ल होतें फूल
क्षणांत पण तें शेजेवरतें झालें हाय मलूल !

आंत-आंत तें हासत होतें,
खेळत होतें, नाचत होतें,
सोडित होतें तें निःश्वासितें,
पाडित होतें भूल.

धक्केबुक्के झंझावातें
दिले तरी तें लेखित नव्हतें,
ताप उन्हाचा सोशित होतें
झेलित होतें शूल.

कलह चालला होता तों तें
प्रसन्न होतें, जिवंत होतें;
सरतां तो, तें सुकलें पुरतें
झाली त्याची धूळ.

नागपूर
१४-१-४७



## २६. इंद्रप्रस्थाकडे

[ झंपा ]

“ जाहलों वेषधर राहिलों गुप्त पण
झाकलें आजवर फाकलें क्षात्रपण,
कातळाच्या तळीं ओघ जो कोंडला
तो उफाळून वर स्वैर ओसंडला,
दुःखदिन संपले पारतंत्र्यांतले
यापुढें सर्वदा जाहलों मोकळे

आजवर जीं शमी– कोटरीं दडविलीं
काढुं तीं तेथलीं आयुधें आपुलीं
कीट झाडूं, पुटें नीट घासूं पुसूं.
धार बोथट न हो, सज्ज परजुन असूं;
जाउं आतां चला, इंद्रप्रस्थाकडे
पाहुं या पाहतें कोण तें वांकडें.

जे अनाचाररत हिंस्र हिंसक महा
घालुं त्यांच्या शिरीं शस्त्रधर हात हा
किंतु असहाय जे, दीन जे, लीन जे,
न्यायनयपालनीं शांतशालीन जे,
आत्मसे मानती भूतमात्रास जे
त्यांस रक्षावया शस्त्र हें पाहिजे.”

नागपूर
२-१०-४७



## २७. सुप्त ज्वालामुखे !

[ झंपा ]

सुप्त ज्वालामुखे !

जनमनीं भ्रांति कीं
झोपसी तूं सुखीं
तुज न पण
स्वस्थपण
दुःख उरिं धगधगे.

तें न जावो उतूं
म्हणुन गिळितोस तूं
वरिवरि
कितितरी
कढ तयाचे मुके !

काढ लळलळ जिभा
चाट चटचट नभा
सर्वभर
गच्चभर
धूमधूसर धुकें.

कोंडमारा स्वतां
करुन घेसी वृथा
धुमससी
मानसीं
दाबसी हुंदके.

दाहकें गंधकें
अग्निमय स्फोटकें
फेक वर
ओक, चल,
तप्त लाव्हा मुखें.

आंतल्या आंत कां
विव्हळसि सारखा ?
भडक रे !
धडक रे !
उडव अंगारकें.

भ्रांतजन केंवि मग
धावती धूम बघ !
चेत चल
रे ! उचल
रक्तध्वज कौतुकें.

नागपूर
२०-६-४७



## २८. छाया

[ पालुपद सार जातीचें. अंतरा अष्टमात्रिक ]

दयाशील ही छाया !
वाटसराची वाट पाहते पडून वाटेवर या !

चढत्या तापें दिन फणफणला
तयांत अ-शरण तो वणवणला
क्षुधेतृषेनें कण्हला-शिणला
असेल गळला जीव, करपली असेल दुबळी काया;—

म्हणून ध्याया त्यास कडेवर
पथालगत ही काय कडेवर—
हांसत नाचत, काढित सुस्वर
पानांचे तळ्हात वाजवित त्यास बाहिते या या !

खुलें हिचें तरुछत्र निरंतर
आर्द्र मृदुल अति मुळांत अंतर
सदासर्वदा सेवातत्पर
थकलेल्या भागलेल्यास ही कुक्षीं वक्षीं ध्याया !

' हा माझा, तो माझा नाहीं '—
भेदभाव हा जाणेना ही !
' बाळें अवघीं, आपण आई '—
हाच भाव, सारखी सदोदित हिची तयांवर माया !



# २९. अर्वाचीन अर्जुन

[ फटका ]

शस्त्र धरूं मी इथें कुणावर ? कुणासवें मी युद्ध करूं ?
कुणाकुणाला रणांत मारूं ? जिवानिशीं वा मीच मरूं ?
जिकडेतिकडे काळिज माझें--कसें बरें तें मीच चिरूं ?
नाडी माझी उडे चहुंकडे—कशी बरें ती मी उकरूं ?
रक्त खेळतें माझें सांडुन कशास देऊं नद्या झरूं ?
हाडें बळकट माझीं उखडुन कशास डोंगर उभे करूं ?

आम्ही जर भाऊभाऊ
सूड कुणावर तर उगवूं
शौर्य कुणाला मी दावूं ?

येथुनतेथुन मानव अवघे असती एक कसे विसरूं ?
तयांतला मी एक तयांवर असा कसा उलटूं घसरूं ?

नको नको कुलकलह नको हा ! गात्रें पांगूळतीं पहा !
सर्वांगावर उठे शहारा ! थरथर कंप सुटे देहा !
कंठ वाळुनी पडे कोरडा ! पडती दोन्ही हात ढिले !
हृदयाला दाहती वेदना ! हळूहळू हें शस्त्र गळे !
भान न माझें मला मुळीं ! मी काय करूं ? मी कसें करूं ?
धैर्य चालतें गळत सारखें सावरून तें किती धरूं ?

सृष्टिनियम पण विसरूं कसा:—
' संरक्षणक्षम, सबळ असा
जगा, तगा, वाढा सहसा
जीवन म्हणजे भीषण रण–तें अव्याहत आहेच सुरू
त्यांत न ठरती भीरू कातर, नका तयांतुन परत फिरूं!'

नागपूर
२६-९-४७.

## ३०. राष्ट्रध्वजास

[ भूप ]

फडक राष्ट्रध्वजा !

भव्य गगनोदरीं
सरल उन्नत शिरीं
धैर्यध्रुव त्यापरी—
तळप तेजें तुझ्या !

प्रतिदिनीं, प्रतिनिशीं
कोटि रवि, कोटि शशि
दाविती दीप तुशिं
वायु गाई ऋचा.

वादळें गर्जती
तुहिनकण वर्षती
भय न तुज, वर्जती—
प्रखरशार जरि विजा.

ध्येय तूं आमुचें
प्रेय तूं आमुचें
श्रेय तूं आमुचें
प्राण अमुचा दूजा !

मुक्त तूं वर कृती,
मुक्त भू भोंवतीं
पाहुनी पावती—
स्फुरण पुलकित भुजा.

नागपूर
६-१०-४७.

तुहिनकण—गारा,
वर्जती—टाकतात, सोडतात.
कृति—कृतार्थ.



## ३१. मयासुरास

[ मुद्रिका ]

मयसभा निर्मुनी मया ! दाविसी कला
तव कलेस नाही नाही त्रिभुवनांत कोठे तुला !

जळ जिथे खरोखर–तिथे भूमि भासते !
भू जिथें खरोखर आहे–जळ तिथें करी वास तें !

तव किमया मायामया न अवगत कुणा,
आश्चर्यचकित जन जो तो वासून उभा आनना !

पण हेतु कलेचा तुझ्या नसे शुद्ध रे !
चकतील कसे जन वेंचे यांतची तुझी बुद्धि रे !

नीतिचें कलेला न ज्या अधिष्ठान रे !
ती असो अलौकिक ! लोकीं तिळ तिची प्रतिष्ठा न रे !

मानतात ‘ मानव ’ अशी कला आसुरी
उरिं घालुन घेतिल कां ते सोन्याची सुंदर सुरी ?

सौंदर्य मात्र वांछिते न केवळ कला
पाहिजे जोडिला त्याच्या सौजन्य, सत्यही तिला.

सौंदर्य, सत्य, सौजन्य यांहिं संकुला—
जी कला, खरोखर आहे ती कला परममंगला !

नागपूर
१७-१०-४७.



## ३२. भाऊबंदकी

[ स्राग्विणी ]

एक आई तिचीं लेंकरें दोन हीं
भांडती तंडती माजवीती दुही
एक राहे तिचा देह तो वांटती,
जीव जातो कधी पाहते वाट तीं.

भांडले भांडले जाहले वेगळे
सिद्ध दोघे तरी आवळाया गळे !
घाम गाळावया एक व्हावें जिथे !
रक्त सांडावया दोन झाले तिथे !!

भाऊ हे कालचे, मित्र हे आजचे,
जाहले यापुढे शत्रु हे रोजचे
आणि शेजारला हे पुन्हा राहती
एकमेकांस पाण्यामधें पाहती.

व्याप्त रात्रंदिनीं हे भयें–संशयें
यांस अन्योन्यविश्वास आता नये !
विश्वबंधुत्व हें शेवटीं स्वप्न ना ?
'श्रेष्ठ मानव्य हें'—काय ही कल्पना

नागपूर
२५-११-४७.



## ३३. श्रमजीवि मधमाशांचा गुंजारव

[ पादाकुलकार्ध ]

फुलाफुलांतुन
दलादलांतुन
प्रत्येक क्षण
वेचित मधुकण
आम्ही वनवन
करितों वणवण.

सहकाराने
श्रमविभाजनें
करितों साऱ्या
समान कार्या.

आम्ही संगीं
वसतों संघीं
राज्य आमुचें
मोहळ साचें.
मधुचा संचय
करितों अक्षय,
मेणाचे थर
रचितों सुंदर

सेवातत्पर
आम्ही नागर.
करी कुणी जर
चाल अम्हांवर
तर मग आम्ही
लाहीलाही—
होउन उठतों
धावत सुटतों
त्याशीं डसतों
आणि शासतों.

'जाय अकारण
एकहि न क्षण,
अविश्रांत श्रम,
अविरत उद्यम,
यांविण जीवन
म्हणजे जीव न.'—
करितों गुणगुण
आम्ही अनुदिन

करितां गुणगुण
करितों नर्तन,

करितां नर्तन
करितों गुणगुण.

नागपूर
२०-६-४८.

शासतों-शिक्षा करतों.



## ३४. कौतुक

[ चौदा अक्षरी छंद. प्रतिचौथ्यावर टाळी ]

माझं बाळ—नको त्याला खेळाया अंगण
खेळतं तें कटीखांदां माझ्या रात्रंदिन.

माझं बाळ—नको त्याला बसायाला गाडी
बसायाला नाहीं त्याला काय माझी मांडी ?

माझं बाळ—नको त्याला झुलायाला झुला
झुलायाला हातांचा या झुला आहे त्याला.

माझं बाळ—नको त्याला झोपायाला गादी
झोपायाला त्याला माझी ऊबदार ' गोदी '

माझं बाळ—नको त्याला पांघराया कांही
पांघराया सज्ज त्याला माझे बाहू दोन्ही

माझं बाळ—पडायाचं नाहीं अंधारांत
तेवतात डोळ्यांच्या या वाती रातरात.

नागपूर
१७-५-४८.

गोदी ( हिंदी शब्द ) उराजवळचा भाग, पुढ्यांत.



## ३५. वामनास आवाहन

[ झंपा ]

ये पुन्हा, ये पुन्हा ये पुन्हा वामना !
बळि बळीचा बळी घ्यावया ये पुन्हा.

अमित मत्तामदें दैत्य हा माजला
अपर लक्ष्मीपती म्हणुन हा गाजला
हाच दात्यांत कीं अग्रणी आजला
नादवुन नाणिं हा नाचवी त्रिभुवना.

अमर सत्ता परी यापुढे चळचळे
अढळ आसन तिचें सारखे डळमळे,
आजवरचें तिचें धैर्य अवघें गळे,
साह्य व्हाया करी ती तुझी याचना.

मूर्ति वामन तुझी किंतु कीर्ती महा,
सधन हा, अधन तूं शक्ति पण दुर्वहा,
पाउलीं दडप, कर भूमिगत दैत्य हा,
नष्ट कर याचिया राक्षसी शासना.

नागपूर
६-७-४८.

## ३६. श्रमसौंदर्य

[ अग्निरथा धावधाव ]

लोहकार ! कर प्रहार
एक-दोन-तीन-चार
कर प्रहार, कर प्रहार.

तप्त लाल लोहखंड
मार्तंडच काय चंड !
पुष्ट दंड तव उदंड–
घण प्रचंड उचल, मार.

आवेशीं घाल घाव
लोहाला रूप-नांव
दे, जसा असेल भाव,
हाण घाव बार-बार.

द्युतिवलयीं अंगारक
उजळतील तव श्रीमुख,
भालिं घर्मकण मौक्तिक
गुंफतील रुचिर हार.

नागपूर
१८-७-४८.



## ३७. भाऊ-भाऊ

[ स्रग्विणी—अपूर्ण ]

हिंदभू आमुची माउली ही
अन् हिचीं लेंकरें सर्व आम्ही
एक कुक्षींतले भाउ-भाऊ
एक राहूं सदा एक राहूं.

भाऊ-भाऊ असूं भिन्न देहीं
अंतरात्मा परी एक राही;
भांडुं-तंडूं पुन्हा एक होऊं
एक राहूं, असूं भाउ-भाऊ.

रक्त नाड्यांतुनी एक वाहे,
मांस पिंडांतलें एक आहे,
आमुचें एक प्रारब्ध आहे
सत्य आम्ही कसे विस्मरूं हें ?

प्रांतभेदांमुळें भिन्न आम्ही ?
भिन्न भाषांमुळें भिन्न आम्ही ?
कल्पना वाउग्या वा खुळ्या ह्या
जाहल्या वीचि का वेगळाल्या ?

वेगळाल्या
    त्या घराला
तेंवि आम्ही असूं
    एक गेहांतले एक

नागपूर
१४-८-४८.

---

## ३८. देवदानवांतला दुवा

[ बालानंद ]

मानव मानव मानव गे !
मानवमय जग हें अवघें
कुणि तांबुस, तर कुणि पिवळे,
कुणि काळे, तर कुणि ढवळे.
केस कुणाच्या शिरिं कुरळे,
गालिं कुणाच्या तर विरळे,
राठ कुणाचे अत्यंत,
तर कोणाचे तुळतुळित.
भिन्न भिन्न असती देश
देश तसे असती वेष,
भिन्न भिन्न असती भाषा,
भिन्न भिन्न आकांक्षाऽशा.
भिन्न भिन्न असती वंश
मुळांत एकच पण अंश,
भिन्न जरी बाह्याकारीं
सर्व अंतरीं एक तरी
वेगवेगळीं पुढें फळें
बीज एकलें पण पहिलें !

*　　*　　*

प्राणि किती तरि जगतांत
जीवनकलहीं जगतात
मैथुननिद्राऽहार भय—
गुण हे सकलीं सामान्य,
मानवांत पण विशेष धी
म्हणुनच तो अग्रीं आधीं
यंत्र गुणांचें या नच तो
स्वतंत्र धीनें तो तगतो.

पशुपक्ष्यांची प्रवृत्ती
एक एकटे चरणें ती
मानवांत जर ती राहे
तर मग मानव तो नोहे !

मरण चुके ना कधीं कुणा
कशास भ्यावें मग मरणा ?
मरण मरावें असें पण
करतिल अवघे जन स्मरण.

मरण न जर मानवकार्यीं
मरण न जर मानवसाह्यीं
जनन मरण तर निरर्थक
मानव नच पशुहुन अधिक !

* * *

हाडामांसारक्ताचा
मानव केवळ नच सांचा,
सत्‌चित्‌तत्त्वांचा आहे
हृदय भावनामय राहे.

समाज, मैत्री, प्रीती त्या
प्रियतम असती सहजगत्या;
गेटे ' शाकुंतल ' वाचे
हर्षभरें उसळे नाचे
आम्हि ' अथेल्लो ' वाचतसूं
डोळ्यांतुन गळती आसू
कारण एकच यास असे
भाव मानसीं एक वसे.
मानव उपजत जिज्ञासू
तो गूढाचा अभ्यासू
ज्ञान असो विज्ञान असो,
संस्कृति किंवा कला असो
प्रगतिपथावर तो चाले
तो बोले दुनिया हाले.

* * *

वेगवेगळें हिताहित,
वेगवेगळें धर्ममत,
वेगवेगळा स्वभाव वा
—कशास पण हेवादावा ?
व्यापारीं व्यवहारिं जर
विचारविनिमय हो सुकर
राजनीतिंत न तो कां हो ?—
आम्ही स्वार्थी रत आहों !

सत्ता, मत्ता, बलवत्ता
एकाच्या हातीं असतां—
तो इतरांवर जुलुम करी
त्यांस नागवी परोपरी
मानवरूपी दानव तो
पृथ्वी सारी आक्रमितो,
समुद्रास तो पालाणी,
घालि गवसणी तो गगनीं,
त्राहि त्राहि करि बंधुजनां
दानव तो ! —तो मानव ना !
परंतु जो सर्वांभूतीं
आत्मौपम्य करी प्रीती
जो न आक्रमक हिंसक वा,
अभिलाष न ज्याला ठावा,
मानवतेस्तव जो झिजतो !
मानवरूपी देवच तो !

* * *

संप्रति मानवता त्रस्त
संशयभयअनयग्रस्त
देवदानवांतील दुवा
मानव तो विश्वास हवा.

नागपूर
१७-९-४८.



# ३१. दोन वृत्ति

[ लीलारति ]

फलभारें लवले पालवले नववृक्ष
 टेकले भूमिवर लावुन सारें लक्ष
अनुभवी जाणता आला मालाकार
 कैच्यांचा त्यानें त्यांस दिला आधार.

—पण नव अननुभवी आला एक अडाणी
 पाहवली नाहीं दाटी त्याला रानीं
हातांत घेउनी तीक्ष्ण परजली कैची
 त्या नववृक्षांची केली त्याने खच्ची.

नागपूर
२६-९-४८.



## ४०. फळ आणि पाखरूं

[ रोला ]

खुपस पाखरा ! खुपस आपुली चोंच खोलवर
अघळ पघळ दे झरूं फळाचें रसार्द्र अंतर
मर्म जाणसी तूंच खरा मर्मज्ञ महत्तर
रसज्ञ टीकाकार एवढा तूंच खरोखर.

टिके न पळ, फळ जें मूळांतच किडलें सडलें
अधःपतित हो गलित दलित तें धुळींत पडलें
तशा फळाची रसिका ! तुजला चहा न अगदीं,
रसरसलें मुसमुसलें फळ तूं त्याचा दर्दी.

तूं करिसी निज चोंचीने आघात तीव्रतर
क्षतें किती हीं, किती आणखी व्रण हे त्यावर,
फळ तें उंच समग्रीं अग्रीं खुले आगळें
चाखाया आस्वाद तयाचा आतुर सगळे.

तूं टपसी उकराया त्याचा लहान रोपा
विशाल तरु होतांच बांधसी त्यावर खोपा.
फळामुळें अत्युच्चपदीं तूं विराजमाना
तुझ्यामुळें फळ गोड, आवडे तें सकलांना.

नागपूर
१९-१२-४८.

## ४१. तुझे डोळे

[ गझल ]

डोळसे ! तुझे डोळे    काजळाविणे काळे
आणि काळवीटाच्या पाडसाहुनी भोळे
पाणिदार ते जात्या,    वाटतें, पहातां त्यां,
मेघ वोळ्ले कां हे श्रावणांतले खाळें !
तेज देखतां त्यांचें    शब्द येति हे वाचे,
कीं नवग्रहांपैकीं काय दोन हे गोळे !
नील नीरजश्यामा    त्यांत रंगली यामा
काय स्वप्नसृष्टीचे हे तिच्या खुळे चाळे !
कौमुदींत कृष्णेचें    नीर खिंदळे नाचे,
बिंब त्या प्रसंगाचें काय त्यांत हें हाले !
काय युग्मकावाणी    या सलील पुष्करणी ?
हीं तयांत मीनेचीं पोहती जुळीं बाळें !
काय-ना कळे ! कांही वृत्ति व्यस्त संदेहीं
वेढुनी तिला गोंवी त्यांत जादुचें जाळें !

नागपूर
२८-१२-४८.



## ४२. डिवचलेला वाघ

[ दिंडी ]

वाघ होता विपिनांत एक सुप्त
व्याध अवचित ये एक कुणी तेथ
सुप्त त्याला पाहून तो म्हणाला,
" संधि नामी ! संधान साधण्याला !

धनुष्याला जोडून तीक्ष्ण बाण
क्षणीं करितों मी यास गतप्राण
आणि नेवोनी चारु चर्म याचें
चिन्ह द्वारावर टांगतों जयाचें "

वाघ जागा तितक्यांत तो जहाला
आणि डरकाळी फोडुनी म्हणाला, —
" क्लांत होतों मी जाहलों श्रमाने
झोपलों मी तुज वाटलें भ्रमाने.

फेक हातांतुन लांब धनुर्बाण
शत्रु माझा मी सोडतों कदा न
पूर्ण आल्यावर एकवार जाग
डिवचलेला झोपे-न पुन्हा वाघ."

नागपूर
२-१-४९.



## ४३. भाग्यपरीक्षा

[ पादाकुलक ]

एका सुंदर तरुणीवरती
प्रेम तिघां तरुणांचें जडलें
त्यांत कुणाला निवडावें पति
कठिण तिला हें कोडें पडलें.

कारण प्रेम तिघांचेंही त्या
होतें उत्कट, होतें बळकट
प्रामाणिक ते तिघेहि जात्या
प्रश्न न, प्रेमळ कोण कितीपट !

पहिल्याचें जर नभाएवढें,
पृथ्विएवढें तर दुसऱ्याचें,
तिसऱ्याचें तर अब्धिएवढें—
प्रेम अपार; न वदवे वाचे !

' काय करावें, कसे करावें ' ?—
पेंच तिला हा पडे निरंतर
विचार करतां तिला सुदैवें—
सुचली तोड—करील निरुत्तर.

निवड कशाला ? भाग्यपरीक्षा—
बघूं, तियेने केला निश्चय
कारण होती प्राप्त मनुष्या
बहुधा भाग्यें जय वा अपजय

तिने आपुल्या दारिं ठेवल्या
फुलझाडांच्या कुंडया तीन
तीन तिघांना दिल्या सिंचण्या
सिंचति त्यां तें प्रेमाधीन !

त्यांत प्रथम ज्या कुंडीवरती
कळी उगवली पहिलीवहिली
कुंडि सिंचली ज्या तरुणें ती
त्यास तिने ती कळी वाहिली.

भाग्य उजळलें त्याचें पाहुन
दुसरे दोघे पुढे जाहले
केलें त्यासह हस्तांदोलन
खेळाडू ते आणि म्हणाले,—

" स्वीकारा हार्दिक अभिनंदन
नांदा प्रेमभरें शत वर्षें
आणि आमुचें ध्या अभिनंदन,
द्या आम्हांला निरोप हर्षें. "

प्रसंग येती असे जीवनीं
भाग्य तयांना उत्तरदायी
हवा खिलाडूपणा म्हणोनी
सौख्याला मग नच कमताई !

नागपूर
३-१-४९.



## ४४. अमर महात्मा

[ लीलारति ]

तूं सत्य-अहिंसा-रत प्रतिगौतमबुद्ध<br>
तूं तनुवाङ्मनसा उदारचरित विशुद्ध<br>
तूं देव मानवांतला दुवा तुटलेला<br>
तूं भूतदयेचा झरा जिता फुटलेला !

तव जीवन म्हणजे सविनय सत्यप्रयोग<br>
नवमानवता मंगलतेस्तव तव 'योग'<br>
रे ! फोडलीस तूं तिच्यांतली तटबंदी<br>
ती तरीच वंदी तुला होउनी बंदी !

जग अवघें असतां युद्धाने उद्भ्रांत<br>
रक्ताचे ताज्या वाहत असतां पाट<br>
निःशस्त्र तूं परी अध्यात्मबलावरती—<br>
आणलीस घडवुन शांतिमयी उत्क्रांती !

नव हिंदराष्ट्र हें, याचा तूं निर्माता<br>
तूं सगासोयरा तूंच पिता तूं माता<br>
पाऊल टाकि हें तुझ्या पाउलावरती—<br>
ने मागे मागे—यास धरी तूं हातीं !

नागपूर<br>
१५-१-४९.

बंदी—भाट



## ४५. तूं हास

[ लीलारति ]

तूं हास आणि जग हसेल सारें संगीं
रड, एकलाच बस रडत आपुल्या जागीं
जग जुनें तयाचें दुःख तेंच तें रोज
म्हणुनीच सुखाचा तें घे अक्षय खोज.

गा गाणें–होतिल प्रतिध्वनित गिरिगुंफा
त्यज ऊन उसासे–हवेंत विरतिल वाफा
जयघोषीं उठती सुसंबद्ध पडसाद
पण चित्कारीं ते पडती होउन रुद्ध.

कर उत्सव–येइल जनता मागें मागें
कर शोक आणि ती जाइल परती वेगें
ती उत्सुक व्हाया आनंदीं सहभागी
पण नको खेद तिज, ती नच मंद अभागी.

अस प्रसन्न–जुळतिल भंवते मित्र असंख्य
हो खिन्न--तोडतिल एक एक ते सख्य
कुणि अव्हेरिल नच तुझा चहाचा प्याला
पण तूंच उकळुनी पी काढ्याचा पाला.

दे मेजवानि तू--भरेल मंडप गच्च
  कर उपास--तेथे शिरेल एकादाच
यश मिळव स्वयें, दे इतरांना, जगशिल तूं
  पण सहाय कुणिहि न, कवळशील जर मृत्यू.

नागपूर
१८-२-४९.

खोज-शोध.



## ४६. दूरस्थ अपत्यांना

[ सुनीत ]

बाळांनो ! तुमच्याशिवाय मजला वाटे इथे एकलें
भासे कीं घर सर्व चोहिंकडुनी खाया उठे आपुलें
हे आहेत समोर ग्रंथ पडले—वाटे नको वाचन,
ही सामग्रि समग्र सिद्ध असुनी—होई नको लेखन.

आहे गाउनि बोलुनी रिझवितो हा सारखा रेडिओ
कानांना अवधान या पण कुठे? कीं त्यास देतील 'ओ'
व्हावें कार्यनिमग्न वेळ म्हणजे जाईल, ही भावना,
पाणी सिंचित हिंडतों उपवनीं; छे ! जीव लागेचना !

तारे मोजित शून्यदृष्टि पडतों रात्रीं पलंगावरी
केव्हा पापणि पापणीस मिळते, तेंही कळेना परी,
नाहीं नीज निवांत, देह थकला राहे पडोनी, पण—
नाहीं स्वस्थपणा, तुम्हांस बघतें स्वप्नांत वेडें मन.

नाहीं भेटत जोंवरी मज तुम्ही प्रत्यक्ष सारेजण
मी राहीन कसाबसा, पलिकडे लोटीन आला दिन.

नागपूर
१४-५-४९.



## ४७. स्वतंत्र भारत

[ आरंभी चंद्रकांत राजाची. शेवटीं अनुष्टुप ]

स्वतंत्र भारत स्वतंत्र भारत स्वतंत्र भारत हा
अनादि काळापासुन आहे जनसेवारत हा.

धर्मजातिमतपंथ कुणाचा असो कोणताही
उदारधी हा त्या सर्वांना समदृष्टी पाही.

याजपाशिं नच विध्वंसक वा संहारक शस्त्रें
मनास करतिल पथप्रदर्शन अशीं परी शास्त्रें.

पूज्य आमुचा पितृदेश हा स्वर्गाहुन श्रेष्ठ
इथे नांदले पुरा आमुचे ऋषी मुनी ज्येष्ठ

भिनलें होतें रुधिरीं त्यांच्या पूर्ण सहिष्णुत्व
मानवतेचे उपकर्ते ते ! हें त्यांचें तत्त्व;–

सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तुनिरामयाः
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद् दुःखमाप्नुयात्

काले वर्षतुं पर्जन्यः पृथिवी शस्यशालिनी
विश्वोऽयं क्षोभरहितो मानवाः सन्तुनिर्भयाः

नागपूर
९-८-४९.



## ४८. ताजमहाल

[ सुनीत ]

कोठे ती मुमताज आज अथवा कोठे शहाजाँह तो?
त्यांच्या नष्ट कलेवरावर स्मृतिप्रासाद हा शोभतो!
त्यांच्या पार्थिव जीवनास विरती येथे मिळाली खरी
मागे त्यांतिल ही अपार्थिव कला आहे तगोनी परी!

छे!–हा ताजमहाल ना! विरह हा प्रत्यक्ष आहे उभा!
अश्रूंनी निज सिंचिला नृपतिने याचा सदा पायवा!
काळा! उज्ज्वल अश्रु हा जणु तुझ्या काळ्या कपोलावर!
किंवा उत्कट पावला प्रणय हा शिल्पांत रूपांतर!

शाहाच्या हृदयामधील अथवा ही चित्रशाळा दिसे?
श्रृंगारप्रियता तदीय अथवा आकारुनी ही बसे?
किंवा सुंदरता समोर उतरे ही काय मूर्तीमती?
दावी हातिं धरून स्वप्न उडतें वा मानवाची मती?

वा जी बीजच जीवसृष्टिस! करी जी तन्विकासोन्नती!–
ती ही स्त्रीपुरुषांतली प्रकटली साक्षात् मनोज्ञा रती?

नागपूर
८-९-४९

विरती–अखेर, अंत



## ४९. उमरखय्यामास

[ लीलारति ]

तुज वेड लागलें नव्हतें ना खय्यामा ?
गणिलेंस कसे तूं कुंभाराला ब्रह्मा ?
तो नदीकांठची घेउन ओली माती
तिंबतो, लिंपतो, थापत बसतो हातीं
घडवितो तिचे मग घट तो चाकावरतीं—
ब्रह्म्याची म्हणुनी पावे का तो महती ?
येती का त्याला त्यांत ओतितां प्राण ?
कुंभार शेवटीं कुंभारच—ब्रह्मा न !

पण सृष्टीच्या या अखंड चक्रावरतीं
निर्मितो क्षणोक्षणिं ब्रह्मा मानवमूर्ती
त्या मूर्ती म्हणजे नसते केवळ माती
त्यांच्यांत चिरंतन तो पाजळतो ज्योती
पण कुंभाराचे घट मातीचे असती
मातींत मिळति ते होते त्यांची माती !

'तत्त्वज्ञ महाकवि' म्हणाति तुजला कोणी
पण तत्त्व खरें नच येई त्यांच्या ध्यानीं
त्वत्तत्त्व 'निराशा' आधीं, अंतीं, मध्यीं
तें सवंग, पोकळ पावे म्हणुन प्रसिद्धी !

तूं पूर्ण निरीश्वरवादी, नश्वरवादी
तव जड देहाला वाटे जीव उपाधी !

तूं निशापुरी तुज हवा निशेचा प्याला
तत्त्वज्ञ कशाचा ?—तूं तर तंबूवाला !
तुज हवी यौवना, हवें अजाचें मांस,
तुज हव्या रुबाया, तूं मतवाला खास !
रे ! या सर्वांची अखेर होइल माती
पण मागे राहिल केवळ जीवनज्योती.

नागपूर
२०-१०-४९.



## ५०. २६—१—५०

[ बारा अक्षरी छंद. सहा व बारावर टाळी ]

देशबांधवांनो ! आज एकत्रित—
एकमुखें गर्जू, ‘ जय हे भारत ! ’

विश्व आहे एक थोरलें कुटुंब
घटक आपण आहों सारे त्यांत—
हृदयाचे ठोके सर्वांचे सारखे !
आणखी नाड्यांच्या उड्या एकजात !

मानव तितुके समान, स्वतंत्र,
एकमेकां देऊं साह्यासाठीं हात,
जागतिक ऐक्य करूं प्रस्थापित,
मानवसेवेचें अंगिकारूं व्रत

हिंदबांधवांनो ! आज एकत्रित—
एक कंठें गर्जू ‘ जय हे भारत ! ’
चालूं एका चालीं सारे समवेत
चला ! पुढे पुढे जाऊं ध्येयाप्रत !

नागपूर
१२-१-५०.



## ५१. ध्वजवन्दन

[ भूप ]

पंख विस्तारुनी तीनरंगी तुझे
फडक राष्ट्रध्वजे ! फडक राष्ट्रध्वजे !

नव नवोत्साह-भरिं
डोल डौलांत वरि
उसळुनी प्रकट करि—
भाव हृदयांत जे !

आमुचा मान तूं,
आमुचा प्राण तूं
उच्च गतिमान तूं—
गरुडशावक दुजें !

या जनां स्थैर्य दे,
शक्तिसामर्थ्य दे,
क्षेम दे, स्थैर्य दे
स्वस्तिकर तव भुजें !

नागपूर
२६-१-५०.



## ५२. मला माझ्या काव्यांत पहा

[ दिंडी ]

मला माझ्या काव्यांत पहा तुम्ही
त्यांत दर्शन देईन तुम्हांला मी
जसा पुष्पाच्या अंतरीं सुवास
असे माझा काव्यांत तसा वास !

वास पुष्पांतुन काढतां न येई
मीहि काव्यापासून भिन्न नाहीं
आस असली जर साच दिसावा मी
मला माझ्या काव्यांत बघा, तुम्ही.

नागपूर
२५-२-५०.



## ५३. दोन कणसें

[ पादाकुलक ]

ज्वारीच्या धांड्यावर एका
दोन परस्परविरुद्ध कणसें
एक उभें वर शेंड्यापाशीं,
दुजें लवे तर पायांसरसें.

सहजासहजीं अगदीं जाई
बघतां बघतां लक्ष प्रथम वर,
कसे बरें तें जावें खालीं ?
कारण बहुधा घाण अधस्थर.

थाटमाट वरच्याचा न्यारा
त्याची वरतीं ताठर गर्दन,
डामडौल लव नच दुसऱ्याचा
मान खालतीं–मानाने पण !

महत्प्रयासें हात लांबवुन
वरच्याला ओढून कापलें
कण सांपडले त्यांत मोजके
परी निघालीं खूप टरफलें.

लीलेनें मग हात वाकवुन
        खालच्यास अलगेंच तोडलें
दाण्यांनीं भरघोंस फुगोनी
        फुटावया तें होतें आलें.

नागपूर
२-६-५०.

अधस्-खालचा.



## ५४. उध्वस्त संसार

[ पांच अक्षरी छंद ]

दोन दिशांनीं आलीं अंगणीं
एक चिमणा, एक चिमणी
चोंचींत चोंची घातल्याक्षणीं,
पंखांशीं पंख घासले त्यांनीं,
गाईलीं गाणीं मंजुळवाणीं,
एक जाहले जीव ते दोन्ही !
कळेना !—क्षणीं काय जाहलें
जीव ते जीव घ्याया उठले.
परस्परांना टोंचून चोंची
रडूं आरडूं लागले चीची
एकामेकांचीं पिसें काढुनी
दोन दिशांना उडालीं दोन्ही
मात्र राहिलें मागे ओसाड—
घरटें त्यांचें झाडांत आड !

नागपूर
११-६-५०.



## ५५. खालचा थर

[ सहा अक्षरी स्वच्छंद छंद ]

नका खातेऱ्याचा करूं तिरस्कार
सडकें किडकें
कुसकें नासकें
नका करुं त्याचा म्हणून धिक्कार.
पोतेरीं, मातेरीं,
राखेचे ढिगारे,
केर नि कचरा,
झाडांचा पातेरा,
साली, फोलपटें,
कागदकपटे,
चिंध्यापांध्या, सूतें,
मलमूत्र, शेण—
सांचून सांचून सुटलीसे घाण,
' शीः-शीः-शीः ' म्हणून—
नका कोंडूं घट्ट रुमालांत नाक
नका शहारून करूं डोळेझाक
घाणींतूनच या हें घे अवतार.
शेताशेतांतून,
खळ्यामळ्यांतून
अन् खेड्यापाड्यांच्या वेशींच्या बाहेर—

जिकडे तिकडे
मोकळे उघडे
याचे घाणेरडे
खड्डे, उकिरडे
भरून राहिले असंख्य अपार;
कृमिकीटकांची त्यांत वळवळ,
मुंग्यामाकोड्यांची शीघ्र हालचाल,
कुत्र्याकोंबड्यांची मिरास त्यांवर.

खातेरें हें खरें
जीवनोपयोगी पण हें अत्यंत;
जाळलें-जळालें,
पावसांत न्हालें,
उन्हांत वाळलें,
मातीशीं मिळालें,
वाऱ्यांत विरली दुर्गंधी अशेष
चढलें वाढलें मोलही विशेष,
आता नशीबींची संपली उपेक्षा
आणि जो तो करूं लागला अपेक्षा,
नुरले पूर्वीचे रंग, रूप, नांव
झाले सच्चरित्र
परम पवित्र
जीवनांत झालें मोठें मन्वंतर
जीर्णशीर्ण झालें नवीन सुंदर.
त्यांत नांदे नव निर्माणक्षमता

कोंदे नवा जोम,
खेळे ताजा दम,
कणाकणांतून तप्तदीप्तचेता;
येतांच बीजांशीं संबंध निकट
होईल संपत्ती समृद्धी प्रकट,
नका करूं अव्हेर वा अनादर
स्रष्टा संजीवक खालचा हा थर !

नागपूर
२४-६-५०.



## ५६. कला आणि जीवन

[ स्वच्छंद पादाकुलक ]

कवि तो केवळ जीवनवादी
इसापनीतींतला कोंबडा
हुडकित असतां घाण उकिरडा
ज्यास मिळाली अमोल हिरकणि
अरसिक तो तिज बघुन म्हणाला,—
" हिचा काय उपयोग जीवनीं ?
हिजपेक्षां सापडती मजला
अर्धीमुर्धी जर कोंडाकणि
तीच खाउनी भरलें असतें
मीं हें माझें पोट उपाशी. "

त्यास कलेची घृणा मनस्वी
जीवनांतला एक अंश ती-
मत हें त्याला मुळीं न सम्मत,
गणी तिला तो गम्मत जम्मत,
स्वप्न, यक्षभू, जादु, भास वा !
म्हणे, " सत्य या पृथ्वितलावर
एकमेव जर असेल कांही,
तर तें आहे केवळ जीवन !
केवळ जीवन ! केवळ जीवन ! "

धिक् रे मानव ! धिक् रे मानव !
पार्थिव हा तव देह असे शव,
कीं भयनिद्राऽहार नि मैथुन
यांचें यंत्रच स्वयंनियंत्रित,
महत्त्व दे या,—पण मर्यादित;
कारण पशुही यांलागीं वश
तुझ्यांत पण रे ! बुद्धि विशेष
जी रिझवाया कला पाहिजे !
कला पाहिजे ! कला पाहिजे !

कला आणखी जीवन यांची
असे सदा सापेक्ष संगती
कलेवाचुनी अपूर्ण जीवन,
कला जीवनावाचुन पूर्ण न;
शरीरपोषण आवश्यक, पण—
हवें सुसंस्कृत त्यामधलें मन;
मन सुंदर तर शरीर सुंदर,
शरीर सुंदर तर मन सुंदर,
कला जीवनीं हवी म्हणोनी
कलेवेगळें रे ! जीवन जें —
तें नच रसमय,
तें नच अक्षय !

नागपूर
३०-६-५०.



## ५७. वर्णविद्वेष

[ तेरा अक्षरी छंद. प्रत्येक चौथ्या अक्षरावर टाळी. ]

काळ्या काळ्या कोळशांनो ! चेता रे चेता
अंतरींचा क्रोधाग्नी द्या फुलूं पुरता.
चोंहोकडोनीया त्याला येऊं द्या जाग
धडकूं द्या, भडकूं द्या, काढूं द्या मार्ग.
अन्यायाला, वैषम्याला जाळा रे, जाळा
पसरूं द्या दूर दूर तांबड्या ज्वाळा.

'काळे काळे' हिणविती तुम्हांला गोरे
राहो स्पर्श, नको त्यांना तुमचें वारें
घेती परी तुम्हांवरी भाजून पोळी
बघती कीं होते कशी राखरांगोळी
कोठेतरी कोपऱ्यांत तुम्हांस जागा
अडगळ तुम्ही त्यांना, जागा रे, जागा.

करीती तें तुम्हांलागीं सळो कीं पळो
नाहीं वाटत कां तुम्हां जिणें हें जळो ?
कोठवरी स्वस्थ, सुस्त राहाल आता ?
जागा जागा, ऊठा ऊठा, चेता रे, चेता.

नागपूर
८-९-५०.



## ५८. प्रीति आणि प्रौढी

[ रोला ]

राणा विक्रमसिंह वृद्ध पण कांटक होता
मर्दानी खेळांचा होता मोठा भोक्ता
त्यास आवडे मदमात्या मल्लांची कुस्ती
उत्सुक तो कीं कोण कुणाची जिरवी मस्ती,
हिंस्र पशूंच्या झुंजींचा तो भारी शौकी
कोण कुणाला पछाड दे हें तो अवलोकी.

अंबेचा नवरात्र महोत्सव चालू असतां
एके दिवशीं राजरथांतुन फिरतां फिरतां—
सर्वे आपुले खासखास दरबारी घेउन
रिंगणांत तो असाच अवचित बसला येउन.
रिंगण म्हणजे अफाट होता एक अखाडा
त्याच्या भंवतीं जाड गजांचा होता कठडा.

होता दरबाऱ्यांत एक त्या तरणाताठा
निज शक्तीचा नव्हता त्याच्या अंगीं ताठा
होते खांदे रुंद, वक्ष दृढ, बाहू बळकट,
अरीस हिय्या हो न कराया त्याशीं कटकट
नांव तयाचें विजयसिंह तो जाणे संयम
धैर्यें, वीर्यें, शौर्यें तो तर प्रतिपुरुषो

तिथेच होत्या बसल्या ललना पडद्यामागे
    पहात होत्या समारंभ त्या अतिअनुरागें
तयांत होती एक देखणी चटकचांदणी
    चमकत झमकत जशी हिरकणी काय कोंदणीं !
लालचुटुक जणु पोंवळीं तिचे ओठ कोंवळे,
    विशाळ डोळे पाणिदार ढग काळे काळे.

विजयसिंह त्या रूपमतीतें होता अति प्रिय
    तशीच होती तीही त्यातें प्रियकर अतिशय
परस्परांची प्रेमपरीक्षा होण्याचा पण—
    अजून नव्हता कधीच आला सौभाग्यक्षण
महोत्सवमिषें आज सहज तो चालुन आला
    त्या उभयांच्या पार न उरला आनंदाला.

आज कधीचे दोन भुकेले सिंह चेवले
    रिंगाणीं होते एकामेकांवरी सोडले
मेघांचा गडगडाट त्यांच्या घुमे गर्जनीं,
    चपलेचा चकचकाट त्यांच्या नाचे नयनीं,
चैतन्याने मुसमुसलेलीं त्यांचीं गात्रें
    घडीघडीला त्यांचे अगदीं नवे पवित्रे !

परस्परांना हाणित होते ते निजपंजे
    जीव जंगली त्यांना कुठचे छक्के पंजे ?
अन्योन्यांचे होते काढित ते वाभाडे,
    होते टाकित झेपा, वासुन ते जाभाडे,
जिकडे तिकडे भूवर होतें रक्त सांडलें
    होतें अंबर लाल धुळीने पूर्ण कोंदलें.

सिंहांची ती झुंज देखुनी वदले राणे,—
“ फार बरें कीं इथेंच आहे अपुलें ठाणें
तेथे असती प्राणांवरतीं खास बेतली...”
वाक्यें असलीं रूपमतीच्या कानीं घुसलीं,
पराक्रमाची तिने परीक्षा करण्याकारण
त्वरें फेकलें हातांमधलें रिंगणिं कंकण.

थक्क जाहले मानकरी नी राणे स्वमनीं,
चकित जाहल्या स्त्रिया घातलीं बोटें वदनीं,
विजयसिंह अविलंबें उठला त्या आव्हानीं
उडी घातली रिंगणामधें त्याने तत्क्षणिं
अन् तें उचलुन फेक साधली अचूक नेमें—
हातींचें त्या हातिं घातलें; पण नच प्रेमें !

वदले राणे, “ भले बहाद्दर ! सहज हा किती—
‘ पराक्रमा’नें विजय मिळविला ‘ प्रीती ’वरती
हवा कशाला हातकांकणालागिं आरसा ?
‘ प्रीति-पराक्रम ’ यांचा जोडा बघा, हा कसा. ”
उत्तरला तों विजयंसिंह, “ ही प्रौढी, न प्रीती,
पराक्रमाला प्रीति पाहिजे नलगे प्रौढी. ”

नागपूर
२-१०-५०.



## ५९. विशाल जीवन

[ आनबान जियामें ]

सागरा ! तुझे तरंग
जीवनीं तुझ्या अ-सीम
निर्मिती नवीन रंग !

नानाविध ते अनेक
तूं परंतु मात्र एक !
ते तुझ्यांत,
तूं न त्यांत,
भव्य तुझें अंतरंग !

ते तुझेच रूप–रंग
एक एक ते त्वदंग
ते जुळून
ते मिळून
तूं अगाध ! तूं अथांग !

भिन्न असुनही अभिन्न,
उच्च-नीच-भेद-हीन,
ते स्वतंत्र,
ते अ-यंत्र,
एकसंध ! एकसंघ !

ते त्वदीय स्कंधिं, उरीं
लोळती प्रमोदभरीं
खिदळती
हिंदळती—
आपसांत एकसंग !

ठाउका न पळ विराम
उसळ–घुसळ आठ याम
कधि अ-शांत,
कधि प्रशांत,
चळवळींत सतत दंग !

तोडा-हाणून दंड
तुटति न, त्यां बळ उदंड !
ते उठोत
कीं फुटोत !
तुझ्यांत अंतिं ते अभंग !

अमरावती
२९-८-५१.



# ६०. जगाचा नकाशा

[ सुमंदारमाला ]

जगाचा नकाशा पुढे मांडलेला सभोंतीं तिथे थोरले बैसले
कसे कोणते रंग द्यावे कुठे—या विचारांत ते सर्वथा रंगले
पडे थाप दारावरी आंत तों ये सभाध्यक्ष जे त्यांत तत्कन्यका
तिला पाहुनी प्रश्न ठाके तयांच्या पुढे, या इथें ही कशाला नि कां?

सभाध्यक्ष मोठे विचारी तयांच्या कपाळीं अठ्यांची खुली कातरी
असे दृष्टि घारीपरी तीक्ष्ण, नाकीं लुला पेंचचष्मा सवारी करी
विचारांत त्यांच्याप्रमाणेंच गाढे दरोबस्त खल्वाट ते सोबती
परी बोलक्या त्या मुलीची कराया न ये बंद कोणासही बोलती.

वयें सान ती, धीट भारी, पित्याच्या चढे अंकिं, बोले; "उठाना, चला,
बघूं मी किती वाट? खेळावयाचा अजुनी नसे वेळ कां जाहला?
मुली; खेळतों मी तुझ्याशीं दुपारीं—असें बोललाना मघाशीं मला?
पहा वाजले पांच, गेलीं कलोनी उन्हें, संपला काम, आता चला."

पिता बोलला, " वेळ आहे अजूनी, नको त्रासवूं, खेळ जा बाहिरी "
चिटोऱ्या चिटोऱ्या करूनी नकाशा दिला, बोलला, "जोड हा तोंवरीं"
म्हणाला, " असे ब्याद गेली करूं तो उहापोह सारे पुन्हा एकदा
असा शांत एकांत ठाऊक कोणा ! पुन्हा प्राप्त होईल कैसा कदा ! "

पुन्हा मग्न झाले तिथे थोरले ते विचारांत कीं विश्व निर्मूं नवें
क्षणाने परी शाहणी कन्यका ती पुन्हा पातली त्या तिथे तों जवें
म्हणे कीं, "पहा, सांधला मीं नकाशा किती छान नी हा कसा चांगला
पहा, पूर्ण पूर्वींप्रमाणेंच आहे जसाच्या तसा संवला रंगला."

पिता बोलला, "जोडला तूं कसा हा? किती वेळ थोडा तुला लागला?
किती जोडतां जोडतां काळ गेला! पुरा आमुचा संघ हा भागला!
अहोरात्र डोकीं किती खाजवीलीं, किती आटवीलें तसे रक्तही,
अहो! साधुनी अन्य गोष्टी अनेका, कशी गोष्ट साधूं नये फक्त ही?"

वदे कन्यका, "दोन बाजूंस होती नकाशाचिया दोन चित्रें भलीं
असे युग्म नारीनराचें तया मी करी नीट आधी उभे स्वस्थळीं
ठिकाणांवरी ठीक डोकीं जिथे नी उभीं नीट पायीं जिथे माणसें
नको कोणिही राजनीतिज्ञ तेथे, नकाशे तिथे सांधती आपसें."

अमरावती
२६-१०-५१.

खल्वाट—टकले.



## ६१. दान

[ अनुष्टुभ ]

पंच पंच उषःकालीं जागली मधुमालती
　　अर्धोन्मीलित नेत्रांनी लागली बघुं भोंवतीं
तों कुठून कुणी आला भृंग गुंगत गुंजत;—
　　" मधु दे—मधु दे " कानीं लागला अनुरंजित.
" घे हवा तेवढा घे " दे त्यास उत्तर मालती
　　भृंगाला 'मधु' प्यायाची चोरी ती मग कोणती?

सांजावे, पश्चिमेसी तों मेघ पिंगट रंगती
　　शीणभागामुळें टाकी मालती मान खालती,
तों पुन्हां भृंग तो येई धुंद झिंगत गुंगत;—
　　" मधु दे—मधु दे " लागे कानाशीं अनुरंजित.
" तो आता उरला कोठें ? " उद्गारे मधुमालती,
　　सर्वस्व दान देवोनी जाहली पण धन्य ती!

अमरावती
१३-१-५२.



## ६२. सहचरीस

[ तिलककामोद ]

ढगाळलेलें माझें जीवन
कड चंदेरी त्याची तूं पण.

क्षणीं उन्हाने सरसावें, तर
क्षणीं सरीने यावें सरसर
इंद्रधनुकली त्यांतिल तूं पण.

सागरगर्जित उदास भेसुर
साथ त्यास दे वारें बेसुर
लकेर घेसी सुरेल तूं पण.

पाणिच पाणी मात्र सर्वभर
कुठेतरी परपार दूरवर
अढळचांदणी समोर तूं पण

करी भयें हें काळीज धुगधुग
धरी संशयें कसेबसे तग
धीर दिलासा दिलेर तूं पण.

अमरावती
२९-६-५२.



# ६३. माकुलें

[ बालानंद ]

निळ्या नभांतुन ये खालीं
बाळाची स्वारी कुकुली !
दोन डोळुले इवलाले,
तोंड हासरें वाटोळें.

ओठ–जणू डाळिंबकळी !
नाक बसे फुगऱ्या गालीं
हातांचे पंजे छोटे,
पायांचीं नाजुक बोटें.

तलम रेशमी तुळतुळतें
जावळ भुरकें भुरभुरतें,
जिभली इवली वळवळती
करी मनाशिंच गुणगुण ती.

लहानगें डोकें इतुकें
विचार त्यांत न मावुं शके !
हृदय चिमुकलें इतुकेंसें
त्यांत शिरावें दुःख कसे ?

कीं आम्हीं जोपासावें
   फूल म्हणुन हें फुले नवें ?
जीव बापुडा हा तान्हा
   प्रेमाचा इच्छी पान्हा !

बाळ चळवळें चिमणें हें
   स्वस्थ न पडुनी पळ राहे
आम्हांला किति आवडतें
   बाप्पालागिंच ठाउक तें !

अमरावती
१४-९-५२.



## ६४. सीमोल्लंघन कोठलें ?

[ सुनीत ]

सीमोल्लंघन कोठलें ? सकल भू गोपाळजीची जिथे,
किंवा आक्रमणें कुठून ? कसली बंदीच जेथे नसे,
सोनें लूट हवी कशास ? ' अवघें माझेंच जेथे असे,
' हें माझें मज, तें तुझें तुज ? नसे भिन्नत्व थोडें जिथे.
आहे मानवमात्र एक, भरला सद्भाव सर्वांतरीं,
आहों आपण भाउ भाउ सगळे एका कुटुंबांतले
आहे विश्वच-ऐसपैस गृह हें देवें दिलें आपुलें !
ठावा एकच धर्म-प्रेम करणें कीं वस्तुजातावरी.

व्यष्टीचें हित वेगळें न, लपलें राहे समष्टींत तें
होऊं साह्य परस्परांस-भिनलें चित्तांत हें अद्वय,
इच्छा,-मंगलतेमधीं मनुजता नांदो सदा निर्भय,—
जो जें वांछिल जीवजात सहजीं होवो तया प्राप्त तें.
जेथे जीवितप्रेय, ध्येय अथवा संश्रेय हेंच स्थिर—
झालें; निश्चित त्या तिथे उतरलें वैकुंठ पृथ्वीवर.

अमरावती
२८-९-५२.



## ६५. श्रीलक्ष्मीस

[ सुनीत ]

नाहीं साध्य तुझ्याशिवाय जगीं या कांहीहि हें नेणुनी
आम्हीं आजवरी उगाच कमले ! केली उपेक्षा तुझी;
तूंतें चंचल, नाशिवंत गणुनी केली तुझी हेलना
नाहीं एकहि योजिला क्षण तुझ्या आराधनीं साधनीं.

तेणें संतत पोखरीत बसली या काळिजीं काळजी
आम्हांला लव सौख्य जीवनभरीं झालें कधी प्राप्त ना !
भाळीं दुःख नि दैन्य, दास्य लिहिलें आहे विधीनेच या
ऐसे मानुनि; हाय ! दोष अवघा आम्हीं दिला प्राक्तना !

आम्ही निष्क्रिय राहिलों, न घडला उद्योग हातून या
आलस्यीं, कलहीं, सुषुप्तिंत वृथा गेलें निघोनी वय !
जे पायीं निज राहती स्थिर उभे तूं साह्य देसी तयां.
अन् जे उद्यमशील त्यांवर तुझी राहे कृपा अक्षय—

आम्ही घेउन ध्यानिं हें जर सदा वागूं पुढे तत्पर
भाग्याचे बनुं आमच्या न मग का आम्ही विधाते तर !

अमरावती
१६-१०-५२.



## ६६. धेयधारणा

[ चामर ]

उतावळेपणाविना, पुन्हा विरंगुळ्याविना
सुधीर हो धरा उरीं सदैव धेयधारणा
गळ्यांत वागवा तिला अमोल ताइतापरी
जिवाहुनी जपा, करा न ईषदेकही दुरी
फुलें फुलोत भोंवतीं न लक्ष द्या तयांकडे
परंतु अंत हो न तों अचिंत जा पुढें पुढें

करा न गर्दिघाइनें उगाच काम वाउगें
पुरोगतीस नाडवा, कलंक व्हा न वाउगे
करा विचार नीट ध्या मनांत सर्व जाणुनी
पुढे ! निघा पुढे पुढे समग्र शक्ति वेंचुनी
नको अधीरता मुळीं, अबोध एकही चुकी—
शताब्दि लोटली तरी भरून ना निघेल कीं !

नको विराम, क्षिप्र हें निघून आयु चाललें
जिवांत जीव तों सदैव द्या पुढेच पाउलें
जिला करील काळही पराभवें नमस्कृती
अशीच उच्च, उज्ज्वला, उदात्त द्या असूं कृती
अशेष आकृत्या यदा विलोपतील शेवटीं
यशस्विनी कृती तदा टिकेल तीच एकटी.

विराम वा त्वरा नको, पहात वाट हो ! रहा
उठोत वादळें महा निमूट सर्व तीं सहा
सदैव ध्येय राहुं द्या ध्रुवापरी पुढे खडे
नका चळूं, नका ढळूं, विशंक जा पुढे पुढे
उतावळेपणा नको, विरंगुळा नको नको
करील ईश तो कृपा विकल्प अल्पही नको.

अमरावती
८-११-५२.

ध्येय—धारण करण्यास योग्य असे तत्त्व.



## ६७. तें माझें घर !

[ स्वच्छंद पादाकुलक ]

बाहेरी मी सकाळपासुन
मावळला दिन
परतलों न पण
म्हणून तिष्ठत असेल बसलें
हृदयीं होउन सचिंत कातर
वीजदिव्यांच्या मिषेंच अनिमिष
कांपत शंकित वरवर थरथर
पहात माझी वाट कधीची
तें माझें घर !
तें माझें घर !

सताड उघडुन दोन्ही दारें
कीं त्या द्वारें
लांब पसरुनी विशाल निजकर
औदार्यानें
मोकळ्या मनें
कवळाया मज असेल आतुर
तें माझें घर !
तें माझें घर !

जणू कुणी मी नव अभ्यागत
म्हणुन कराया माझें स्वागत
पर्युत्सुक होउन अभ्यंतर
दारावरली तोरण-झालर
‘ स्वागत-स्वागत-स्वागत-स्वागत ’
असेल छेडित एक हीच गत
भाग्यवंत मी अहो ! खरोखर
तें माझें घर !
तें माझें घर !

पायधूळ मी झाडिन म्हणुनी
उंबरठ्याशीं असेल पडुनी
मम वाटेने
उत्कंठेने
पावदान अति नम्र अधस्स्तर
तें माझें घर !
तें माझें घर !

आणिक अंतर्गृहीं स्टोव्हवर
आनंदाच्या उकळ्या फुटुनी
उत्साहाने हासत नाचत
राजिखुशीने असेल गर्जत
चहा मधुरतर
ब्रेड बरोबर
पतिपत्नींचें मिथुन मनोहर
चहा तयांची साऱ्या जगभर
तें माझें घर !
तें माझें घर !

हिंदि, मराठी आणि इंग्रजी
नियतकालिकें वेगवेगळीं—
छे ! ती माझी मित्रमंडळी !
मेजाभंवती असतिल सगळीं
बोलायाला मजशिं उतावळि
प्रचलित नानाविध विषयांवर
विचार त्यांचे गभीरसुंदर,
अधुनी मधुनी कथा व कविता
चुटके-चटके गमतीखातर
तें माझें घर !
तें माझें घर !
करावया मम मनोविनोदन
अधीर अगदीं स्वरसंवाहक—
असेल;
मजला म्हणल, " ऐका !
गायन-वादन मंजुळ मोहक;
नभोवाणिचीं अनेक केंद्रें
रुचेल तुम्हां लावा त्यांतिल
सिलोन, गोंवें किंवा लखनउ
ठणठण ठोके पडल्यावर नउ
दिल्लीवरुनी करित प्रसारित
' हम दिल्ली से बोल रहे हैं '
कथतिल वार्ता मग वार्ताहर
ताज्या ताज्या सर्व एकसर
तें माझें घर !
तें माझें घर !

मी वणवणलों
अतिशय शिणलों
नयेत होऊं कष्ट मला लव
श्रमलय व्हावा माझा यास्तव
मज उत्संगीं उत्सुक घ्याया
सज्ज सारखी असेल शय्या
निजविल ती मज माझी आई
करीत मजला ' गाई-गाई '
माया मजवर
तिची अनावर
तें माझें घर !
तें माझें घर !

अमरावती
४-३-५३.

अधस्स्तर—खालचा थर.



## ६८. शोध

[ आठ अक्षरी ओवी ]

एका क्षणांत लवावी दुज्या क्षणांत लपावी—
वीज जशी ढगामाजी, दृष्टि लोळानें दिपावी
तशी दिसतां दिसतां झाली तमीं ती नाहिशी
पसरली जों जों निशी
हळूहळू दाही दिशीं

येथेंच ती कुठे तरी आहे खास आसपास
तिच्या केशपाशाचा हा मत्त मादक सुवास
येतो,-तिकडे जाऊं का ? कुठे कुठे तिला पाहूं ?
पसरून दोन्ही बाहू—
किती किती तिला बाहूं ?

वेलीआड-कुंजाखालीं कुठेतरी येथेच ती
किणकिण किणकिण तिचीं कांकणें नादती
नादाने त्या नादावून तिचा शोधूं कुठे ठाव ?
करूं किती धावाधाव ?
घेऊं किती तिचें नांव ?

होतो तळ्याच्या दिशेला तिचा भास क्षणोक्षणीं
चमचम चमकीची चमकते हिरकणी
काजव्याचा उजेड का ? छे ! तो नाहीं, नाहीं, नाहीं
कुठे येथेच ती राही
याच गोष्टीची ही ग्वाही !

चतुर्थीचा चारु चंद्र आला उदयाला नभीं
बघा ! रजनीगंधेच्या लगत ती आहे उभी
दोघीजणी टाकती त्या सौम्य गंधित निश्वास
तिचा कळ्ला निवास
तिचा लागला तलास !

अमरावती
६-३-५२.

रजनीगंधा—Lady of the night.



## ६९. शाबास आहे तुझी !

[ सुनीत ]

हे क्रांतिप्रिय वीरभद्र भगता ! शाबास आहे तुझी
जीवाची तुज वाटली न अगदीं कांही कशी काळजी ?
सत्तेनें असती पदोपदिं किती कांटेकुटे पेरिले
द्याया पाय सुरक्षित स्थळ नसे कोठे मुळीं ठेविलें
धीरा ! वाट परंतु निर्भयपणें त्यांतून तूं काढिसी
मागोमाग स्वकीय मित्रगण हा उत्तेजुनी ओढिसी
नेसी आणि तडीस त्यांसह असे जें कार्य आरंभिलें
कोणी कांहि म्हणो, न तत्त्व त्यजिसी आजीव तूं आपुलें.

स्वार्थी कांहिं फितूर होउन परी शत्रुत्व संपादिती
देशद्रोह करून फास तुमच्या देती गळ्याभोंवतीं
सांडे शुद्ध पवित्र रक्त तुमचें भूजन्मदेच्या शिरीं
आनंदें जयघोष हाय ! जुलुमी सैतानशाही करी.
जातो आज दिशांस भेदुन जरी तन्नाद तो जाउं द्या
राष्ट्रोद्धारक जन्मतील तुमच्या रक्तांतुनी या उद्यां !

नागपूर
१७-१०-३०.

## ७०. मनींची आशा

[ शार्दूलविक्रीडित ]

हे संसार सुखोपभोग अगदीं होती नकोसे मला
गोडी त्यांत असेल कोठुन ? तयां हा जीव कंटाळला !
त्यांच्यापासुन दूरदूर अगदीं मी दूर आतां पळें
विश्रांतिस्थल आणि धुंडित फिरे कोठे कसे आढळे.

शैलाच्या पदरांत खोल दडली मातें गुहा पाहिजे
माजे रान जिच्यावरी, जन कुणी जाया न जेथे धजे
जेथे शांतिसुखाशिवाय न दुजें, मागे नसे काळजी
जेथे दुःख न व्यावहारिक सले कांट्यापरी काळिजीं.

तेथें एक लहानसें मज हवें साधेंसुधें झोपडें
मी राहीन तयांत सोबत मला किर्काट झाडेंझुडें
गाणीं गातिल गोड त्यांत बसुनी लक्षावधी पांखरें.
पेट्या वाजवतील साथ म्हणुनी हे धावणारे झरे.

पानें हीं न—असंख्य ग्रंथ जणु हे ग्रंथालयीं माझिया,
—'हें कार्यालय आपुलें '—गणिन कीं मी पुष्पवाटेस या
शाखेची कलिका निरोप मजला सांगेल कांहीतरी
प्याला द्राक्षरसें, गणीन भरला मी पृथ्विमोलापरी.

दूर्वांची मज शेज होइल, उसें होईल डावी भुजा
निद्रामंदिरिं छे ! नसेल लवही स्वर्गांतल्या ही मजा
माझ्याबद्दल पाखरांस इतुकी वाटेल आपूलिकी
त्यांच्या नाजुक अंतरीं भय असे कांही न राहील कीं !

दोतर्फा तृण गारगार हिरवें डोलेल वाऱ्यावरी
छायाचित्र सुरेख स्वच्छ सरिता घेईल स्वाभ्यंतरीं
दृष्टी वेधिल दृश्य राहिल असे नामी धुक्याचें महा
लाटाही बघतील उंचवुन तें माना पुन्हाच्या पुन्हा.

चारा ताणुन हातपाय निजला राहील भूच्या कुशीं
तेजानें चमकेल ओस पडलें पानांफुलांच्या फशीं
कासारावर वाकवाकुन कळी स्पर्शीत त्याला असे
कीं कोणी रमणीय रूप मुकुरीं पाही स्वतःचें जसे.

सांजीं सूर्य सजेल चर्चुन रवा जेव्हा वरासारखा
हातीं घेतिल सज्ज वल्लरि तया अर्पावया मालिका
तों वातावरणास श्यामलपणा झाकील कांही असा
काळी कांबळ पांघरून भटके कोणी तपी कीं जसा.

अस्ता जाइल पश्चिमेस सविता कांही ढबेने अशा
शेल्याच्या जणु त्याचिया कुणितरी ओढीतसे कीं दशा
मार्गीं होतिल श्रांत रात्र पडतां पांथस्थ जेव्हा कुणी
त्यांना देइल धीर संथ पणती ही तेवुनी त्या क्षणीं.

मेघांनी मळलें असेल दिवसां आभाळ जेव्हा कधी
तेव्हा वीज लखाखुनी मम कुटी दावील साधीसुधी
मातें आणिल जाग कोयळ कुहूशब्दें-उषादूतिका !
ती मातें प्रिय फार त्यापरि तिला मी मान्य होईन का ?

माझ्या कानिं पडोत न क्षणभरीं वार्ता जगाच्या वृथा
मी मानीन कुटीस थोर मजला आधार ती सर्वथा
ओसंडे जणु—चांदण्यांत भरली भासेल थंडी अशी
कीं कोणी फिरवी गमेल सळई नेत्रांजनाची जशी !

पुष्पांचीं वदनें धुण्या निजकरीं येईल जेव्हा उषा
तेव्हा होइन मी प्रसन्न बघुनी सानंद प्राची दिशा
देशाची परि पाहुनी अवनती ढाळीन मी आसवें.
अंगीं येइल त्यामुळे हळुहळू चैतन्य माझ्या नवें !

आहे जोंवर उंच हें पसरलें नीलाभ तारांगण
देशाच्या हितचिंतनांतच सदा लागेल माझें मन
साश्रू होतिल देशभक्त बघुनी मल्लोचनीं आसवें
जे जे कोणि असावधान सहसा होतील जागे जवें.

नागपूर
१२-७-३८.



# ७१. पिंजऱ्यांतील बुलबुलाची फिर्याद

[ शार्दूलविक्रीडित ]

गेला काळ सुखांत जो अहह ! तो आता मला आठवे
उद्यानांमधले महा विटप ते, तें नीड माझें नवें,
तें सर्वांसह उंच उंच उडणें, आकाशसंचार ते.
उद्यानांमधल्या बहारबहरी त्या, वृंदसंगीत तें,

पानांचें लतिकांवरी डुलडुल सानंद तें डोलणें,
टाळ्या वाजविणें जवें निसटतां कुंजांतुनी वायुने,
प्रातःकालिं धुणें प्रसूनवदनें तैसे उषेनें करीं—
हें जों दृश्य स्मरे मला; त्वरित तों आघात हो अंतरीं !

मादी ती मम साजिरी, लघु पिलें तीं लाडकीं गोजिरीं
होता नांदत ज्यांमुळें प्रतिपलीं आनंद माझ्या घरीं
स्वातंत्र्यें सदनांतलीं निज अहो ! आतां कुठे तीं इथें
बाहेरी पडणें, घरीं परतणें मर्जीप्रमाणें जिथे.

माझा जीव पुन्हा पुन्हा तळमळे होतां गृहाची स्मृती
दैवीं ‘ पंजरिंचें ’ परंतु लिहिलें या ‘ अन्नपाणी इती ’
बंदीची भगवान ! या तुजविणा सांगूं कहाणी कुणा ?
वाटे भीति, शरीर काचुन कुठें गांठो मला मृत्यु ना !

आहें दुर्भग केवढा खचित मी, जाया झुरे कोटरीं
सांगाती मम राहती उपवनीं, बंदींत या मी परी,
उद्यानांत वसंत ये नव फुलें, ताज्या कळ्या हासती
काळ्या काजळकोठडींत परि मी निंदी ललाटाप्रती.

उद्यानीं रमती अहा ! संवगडी आतां वसंतोत्सवीं
येथे मी परि एकटा तळमळे दुःखांत हा—हा रवीं
हाका ते मज मारिती परि न त्या ऐकूंच येती मला
नाहीं हाय ! स्वतंत्रताहि--असती, होतों क्षणीं मोकळा !

जावें उंच भरारुनी उपवनीं, इच्छी असे मन्मन
व्हावें पूर्ण स्वतंत्र, स्वैर अगदीं गावें गळा ओतुन
थाटावें चिमणें बिऱ्हाड फिरुनी वेलीवरी प्रीतिने
पत्तींनीं हिरव्या उजाड घरटें तें शोभवावें जुनें.

धान्याचे कण वावरीं विखरले वेगें टिपावे पुन्हा
भेटावें उरिं आवळून अवध्या त्या आप्तस्नेही जनां
यावा वैभवकाल पूर्व परता, रानीं फिरावें पुन्हा
जावें उंच उडून, मुक्त वनिंच्या प्यावें सुखी जीवना.

जेव्हापासुन मी घरास मुकलों, झाली दशा शोच्य ही
आहें दुःख गिळीत मी, गिळित हा ! आहे मला दुःखही
गाणें मानुन हीस मोद नसता होवो न श्रोत्यांप्रत
ही फिर्याद जगीं सदैव करिती जे दीन, जे दुःखित.

स्वातंत्र्यांत जिणें असेल जगला जो भाग्यशाली कुणी
बंदीची कटु कल्पना लव कशी येईल त्यातें मनीं ?
होऊं दे मज रे ! स्वतंत्र, न इथें डांबून ठेवी मला
मी निर्दोष; करून मुक्त मज तूं, घे आशि माझा भला.

नागपूर
१९-९-३८.



## ७२. रसिकास

[ हरिगीतिका ]

सहजीं किती फुलती फुलें
  नि सुवास त्यांतिल दर्वळे
अवकाशिं तो मिसळे-मिळे
  पळ त्यामुळें मन हो खुळें !

गळती यथावधि तीं फुलें
  निघती तयांमधुनी फळें
पिकतांच तीं, फुटतांच तीं
  रस ओघळे ! रस पाघळे !

रसिका ! तुला रस तो हवा ?—
  नि सुवासही ?—पण तो 'हवा' !
सुकलीं फुलें, पिकलीं फळें
  रस लूट खूप नवा नवा !!

नागपूर
२६-१-४७.



# टीपा

कवितांचा क्रमांक

३ मंगळवार दिनांक ३० जानेवारी १९४५ ला नागपूर विद्यापीठाच्या कृपेने माझ्यासारख्या कांही प्राध्यापकांना अल्पकाल विमानांतून भरारण्याचें भाग्य लाभलें, त्या प्रसंगीं.

६ दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या वेळीं.

१० श्रद्धानंदनगर, नागपूर, अजनी येथील माझ्या स्वतःच्या बंगल्याचें नांव.

१२ दिनांक ६-८-४५ ला जपानच्या हिरोशिमा आणि नागासाकी या दोन ठिकाणांवर अणुबॉंब टाकून दोन लाख जीवांची राख करण्यांत आली तेव्हां.

१७ ही कविता 'मराठी कविता-१९२०—१९५०' या संग्रहांतहि आहे. माझ्याशीं प्रत्यक्ष परिचय नसलेल्या कर्नल हेमचंद्र गुप्ते यांनीं ही कविता दिल्ली येथील महाराष्ट्रसमाजांत अत्यंत परिणामकारक रीतीने म्हणून दाखविल्याचें वृत्त ९ एप्रिल १९५२ च्या 'मौजें'त आहे.

१९ गेल्या महायुद्धांत तांदुळाच्या कृत्रिम दुष्काळाने बंगालची उपासमार करण्यांत आली त्यावेळीं.

२३ Chuby cheeks, dimple chin & etc या गीतावरून.

२६ सुभाष बोस यांच्या 'दिल्ली चलो' या उद्घोषावरून. हें व यापुढील २९ व ३१ हीं गीतें महाभारतांतील कांहीं प्रसंगांचें सद्यःपरिस्थितीशीं साम्य दिसल्यामुळें स्फुरलीं आहेत. २९ मध्यें

भारताचे दोन तुकडे होत असतांनाची मनःस्थिति आहे. ३१ मध्यें कला व नीति हा वाङ्मयीन वाद आहे.

२८ निर्वासितांना आश्रय देणारी भारतीय वृत्ति.

३२ देशाच्या विभाजनावर.

३५ प्रसंग—रझ्झाकारांचे अनन्वित अत्याचार.

३७ अकारण भाषिकवादास अनुलक्षून.

३९ विधायक आणि विघातक वृत्तींच्या कार्यकर्त्यांना उपलक्ष करून.

४० रसिक टीकाकारास उद्देशून.

४२ देशांतील विवक्षित मताचा एकपक्ष. संदर्भ—' भ्रमानें आहे रे ! गिरिकुहरिं हा निद्रित हरी. '

४४ महात्मा गांधींच्या प्रथम स्मृतिदिनाच्या पंधरवड्यांत.

४९ सुप्रसिद्ध इराणी कवि उमरखय्याम हा निशापूरचा रहिवासी होता. तो व्यवसायाने तंबूवाला होता. ' खुजानामा ' हें मातीच्या सुरईला उद्देशून लिहिलेलें त्याचें काव्य आणि ' या इथें तरुतळीं एक वही कवितेची ' इत्यादि त्याच्या रुबाया रसिकांच्या परिचयाच्या आहेतच.

५३ राव आणि रंकवर्ग यांना उद्देशून.

५४ वारंवार ऐकूं येणाऱ्या घटस्फोटांना उद्देशून.

५५ समाजांतील दलितांची बाजू.

५६ एक वाङ्मयीन वाद.

५७ आफ्रिकेंतील अत्याचारांच्या वार्ता वाचून.

५८ Leigh Hunt याच्या Valour and Vanity च्या आधारें.

५९ विशाल मानवता ही परमेश्वरस्वरूप आहे. तिच्या चैतन्यमय जीवनांत वरवर विसंगति, विसंवाद व विरोध यांचा आढळ

होतो. परंतु तिच्या अंतरंगांत खरोखर सुसंगति, सुसंवाद व अविरोध यांचेंच अस्तित्व असतें. हें तत्त्व सागराच्या रूपकाचा आश्रय घेऊन या गीतांत विशद करण्याचा प्रयत्न केला आहे.

६० गेल्या महायुद्धांतील ॲटलांटिक सनदेवरून.

६१ रवींद्रांच्या एका गीताच्या मुग्ध आधारें.

६३ एका इंग्रजी गीताचें रूपांतर.

६६ मूळ Johann W. Von Goethe याचें जर्मनगीत ‘Without haste! without rest’ हें त्याचें इंग्रजी भाषांतर. त्यावरून प्रस्तुत मराठी भाषांतर.

७० व ७१ मोहम्मद इक्बाल यांच्या उर्दू कवितांचीं भाषांतरें.



# कवितांचे प्रथम चरण : सूचि

कवितांचा क्रमांक


२५ अवते भंवते होते कांटे प्रफुल्ल होतें फूल.

४ आभाळ चहूंकडुनी भरलें.

६६ उतावळेपणाविना, पुन्हा विरंगुळ्याविना.

३ उंच उंच रे ! विमान.

२१ उन्माद अदम्य तुझा प्रणया !

३२ एक आई तिचीं लेकरें दोन हीं.

४३ एका सुंदर तरुणीवरतीं.

६८ एका क्षणांत लवावी, दुज्या क्षणांत लपावी

५६ कवि तो केवळ जीवनवादी.

५७ काळ्या काळ्या कोळशांनो ! चेता रे चेता.

४८ कोठे ती मुमताज आज अथवा कोठे शहाजाँह तो !

४० खुपस पांखरा ! खुपस आपली चोंच खोलवर.

७१ गेला काळ सुखांत जो अहह ! तो आता मला आठवे.

२४ गेला तो ऋतु ! गेला तो ऋतु !

६० जगाचा नकाशा पुढे मांडलेला सभोंतीं तिघे थोरले बैसले.

२६ जाहलों वेषधर, राहिलों गुप्त पण.

५३ ज्वारीच्या धांड्यावर एका.

४१ डोळसे तुझे डोळे काजळाविणे काळे.

६२ ढगाळलेलें माझें जीवन.

४९ तुज वेड लागलें नव्हतें ना खय्यामा !

४४ तूं सत्यअहिंसारत प्रतिगौतमबुद्ध.
४५ तूं हास आणि जग हसेल सारें संगीं.
११ थांब-थांब-थांब क्षणिक.
२८ दयाशील ही छाया.
५० देशबांधवांनो ! आज एकत्रित.
५४ दोन दिशांनी आली अंगणीं.
५५ नका खातेऱ्याचा करूं तिरस्कार.
६५ नाहीं साध्य तुझ्याशिवाय जगतीं कांहीहि हें नेणुनी
१० निवांत शांत किती आपुलें निकेत सखे !
१२ निष्ठुरांनो ! काय हें !
६३ निळ्या नभांतुन ये खालीं
५ पतंगा ! किती असा उडशील ?
८ परंपरागत तेंच जुनें जग.
५१ पंख विस्तारुनी तीनरंगी तुझे.
६१ पंच पंच उषःकालीं जागली मधुमालती.
१७ पिवळ्या पाना ! पड, पड, पड.
३० फडक राष्ट्रध्वजा !
३९ फलभारें लवले पालवले नववृक्ष.
३३ फुलाफुलांतुन, दलादलांतुन.
६७ बाहेरी मी सकाळपासुन.
४६ बाळांनो ! तुमच्याशिवाय मजला वाटे इथें एकलें.
२३ मऊ मऊ लाल.
३१ मयसभा निर्मुनी मया ! दाविसी कला.
५२ मला माझ्या काव्यांत पहा तुम्ही.

१ मळा न केवळ रसिका ! हा माझाच.

३४ माझं बाळ-नको त्याला खेळाया अंगण.

३८ मानव मानव मानव गे !

२२ मुकुटांत मनोहर मोरपिसें.

१८ या शेल्याहुन त्या शेल्यावर.

३५ ये पुन्हा, ये पुन्हा, ये पुन्हा वामना !

१९ ये ही क्षुधाराक्षसी खूप खादाड.

५८ राणा विक्रमसिंह वृद्ध पण काटक होता.

२ रे ! विमान संचरसी स्वैर अंतराळीं.

१५ लाडकें जिवाचें फूल तुझें.

३६ लोहकार ! कर प्रहार.

६ वर्चस्वास्तव जगतीं.

४२ वाघ होता विपिनांत एक सुप्त.

१६ विश्वच अवघें हें माझें घर.

७ शरद शंभर जगूं.

२९ शस्त्र धरूं मी इथें कुणावर ? कुणासवें मी युद्ध करूं ?

२० श्रमजीवी चाकांनो ! थांबा.

७२ सहजीं किती फुलतीं फुलें.

५९ सागरा ! तुझे तरंग.

६४ सीमोल्लंघन कोठलें ? सकल भू गोपाळजीची जिथे.

२७ सुप्त ज्वालामुखे !

४७ स्वतंत्र भारत स्वतंत्र भारत स्वतंत्र भारत हा.

३७ हिंदभू आमुची माउली ही.

१४ हे अजस्र यंत्रा !

६९ हे क्रांतिप्रिय वीरभद्र भगता ! शाबास आहे तुझी.
७० हे संसारसुखोपभोग अगदीं होती नकोसे मला.
९ क्षणमात्रच केवल तूं रमणी.
१३ क्षितिजावर श्रावण ढग तिरती.



## भवानीशंकर श्री. पंडित यांचें वाङ्मय

### कवितासंग्रह

१. पिचलेला पांवा
२. उन्मेष आणि उद्रेक
३. सुवास आणि रस

### शिशुगीतसंग्रह

१. बीजेची कोर
२. चवथीचा चांद
३. अष्टमीचा चंद्र
४. पौर्णिमेचें चांदणें
५. सदाफुली

### बालकथा

१. सोन्याची गाडी

### ललित लघुलेखसंग्रह

१. सवडीचे क्षण

### प्रबंध

१. आधुनिक मराठी कविता

### संकलनात्मक कवितासंग्रह

१. काव्यकलाप ( प्राचीन व अर्वाचीन कवि )
२. रसधारा ( अर्वाचीन कवि )